शिक्षणखात्यांचा मंजुरी क्रमांक: पापुमं/१०९१/बामाम/१७६५६/(१)-स, दिनांक ३०-९-१९९१

# इयत्ता चौथी

# मराठी बालभारती



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

प्रथमावृत्ती : १९९२
पुनर्मुद्रण : १९९६



मराठी भाषा समिती :

डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष
डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य
श्री. दया पवार, सदस्य
श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य
श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य
श्रीमती प्रतिभा जंगले, सदस्य
श्री. गोविंद नांदेडे, विशेषाधिकारी (मराठी)

चित्रकार : श्री. जयप्रकाश जगताप, श्री. एस.के. परब

मुखपृष्ठ : **श्री. एस. के. परब**

निर्मिती :

श्री. सुनिल सांखोळकर, निर्मिती अधिकारी
**श्री. नितिन तांबे, निर्मिती साहाय्यक**

फोटोसेटिंग : मे. अक्षर फोटोटाईपसेटर्स, यशोदा सदन, मुंबई-४०० ०१६.

कागद : ६१ × ८६ सेमी. ६० जी. एस्. एम्.

प्रकाशक : श्री.पी. वाय. साळवी, नियंत्रक, पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, मुंबई-४०० ०१८.

मुद्रक : प्रभात प्रिंटिंग वर्क्स, ४२७, गुलटेकडी, पुणे ४११ ०३७

मुद्रणादेश : N/Ptg./T. B./770 1,00,000

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६' अनुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम १९८८' हा तयार करण्यात आला.

या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी विषयाची इयत्ता १ ली ते ८ वीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ प्रकाशित करत आहे. या मालेतील चौथे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

आकलन व अभिव्यक्ती साधली की भाषा अवगत झाली, असे म्हणता येते. त्यासाठी श्रवण, वाचन, संभाषण, लेखन यांची कौशल्ये आत्मसात करणे अगत्याचे ठरते. मंडळाने या उद्देशानेच गतवर्षी तिसरीचे पुस्तक प्रकाशित केलेले आहे. आत्मसात केलेली वरील कौशल्ये अधिकाधिक विकसित करण्याचा उद्देश आता डोळ्यांपुढे आहे. अभ्यासक्रमानुसार व्याकरणाचे अध्ययन सुलभ व्हावे म्हणून स्वाध्यायात इष्ट ते प्रश्न घातलेले आहेत. स्वाध्यायांचे अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेऊन इयत्ता दुसरीच्या पाठ्यपुस्तकात स्वाध्याय भरपूर प्रमाणात स्वतंत्रपणे अंतर्भूत करण्यात आले होते. परंतु पाठ्यपुस्तकांच्या किमती मर्यादित व वाजवी ठेवणे अत्यावश्यक असल्याने इयत्ता ३ रीपासून स्वाध्याय स्वतंत्रपणे अंतर्भूत न करता प्रत्येक पाठ/कविता संपल्यावर अत्यंत वस्तुनिष्ठ व निवडक स्वरूपातील स्वाध्याय देण्यात आलेले असून अन्य महत्वाच्या स्वाध्यायांचा समावेश/निर्देश अध्यापन-पुस्तिकेत करण्यात आलेला आहे.

अध्ययन व अध्यापन प्रभावी होण्यासाठी मंडळाने प्रकाशित केलेल्या या पुस्तकाच्या अध्यापन-पुस्तिकेचा मुलांकडून स्वाध्याय सोडवून घेण्यासाठी शिक्षक व सुजाण पालकांना लक्षणीय उपयोग होईल, असा विश्वास वाटतो.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झाले आहे. हे पाठ्यपुस्तक तयार करताना मराठी भाषा समितीला ज्या अनेक साहित्यिकांचे, तज्ज्ञांचे आणि श्री. व. द. देसाई या निमंत्रित सदस्यांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मन:पूर्वक आभारी आहे.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

संचालक<br>
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती<br>
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे-४.

पुणे :<br>
दिनांक : १७ ऑक्टोबर १९९१<br>
विजयादशमी, सौर आश्विन २५,<br>
शके १९१३.

# अनुक्रमणिका

# १. सोनूताई



कन्या झाली म्हणून
नको करू हेळसांड
गोपूबाळाच्या शेजारी
सोनूताईचा पाट मांड.

लेकाच्या परीस
लेक ती काय उणी?
हिरा नव्हे हिरकणी
सोनूताई.

लाडकी सोनूताई
लाड करू मी कशाचा?
चंद्रमा आकाशीचा
मागतसे.

आंबा मोहरला
मोहरला पानोपानी
बाबांच्या कडे तान्ही
सोनूताई.

माझ्या ग अंगणात
शेजीचे खेळे बाळ
संगे शोभे लडिवाळ
सोनूताई.

बापाची लाडकी
बाप म्हणे कुठे गेली?
हासत दारी आली
सोनूताई.



कानांतले डूल
हालती लुटुलुटु
बोलते चुटूचुटू
सोनूताई.

साखळ्या वाळ्यांचा
नाद येतो माझ्या कानी
आली खेळूनिया तान्ही
सोनूताई.

हेळसांड — दुर्लक्ष. उणी — कमी.

### स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) गोपूवाळाच्या शेजारी कोणाचा प्राट मांडायला सांगितले आहे?
  (२) सोनूताई काय मागत असे?
  (३) कोणते झाड पानोपानी मोहरले?
  (४) सोनूताईबरोबर अंगणात कोण खेळते?
  (५) दारात कोण हसत आली?

- **पुढील शब्दांचे अर्थ लिहा.**
  कन्या, परीस, चंद्रमा, शेजी, नाद.

- **पुढील शब्दांचा वाक्यात उपयोग करा.**
  लुटुलुटु, चुटूचुटू, मुळूमुळू.



# २. आपले मित्र

सकाळची वेळ होती. छान ऊन पडले होते. क्रिकेट खेळायला कित्ती कित्ती गंमत येईल! पण खेळणार कुठे? हा प्रश्न छोट्या संदीपला सतावत होता. रस्त्यात खेळायचे नाही आणि आजूबाजूला मोकळे मैदान नाही. कॉलनीतल्या छोट्या छोट्या रस्त्यांवरदेखील क्रिकेट नको. का? तर म्हणे, लोकांच्या खिडक्यांच्या काचा फुटतील. ही मोठी माणसे तरी किती विचित्र असतात. घराच्या खिडक्यांना काचा लावतातच कशाला? खरे म्हणजे आमच्या घराचे आवार कित्ती मोठे आहे. क्रिकेट खेळायला अगदी योग्य. पण या मोठ्या माणसांना मुळी काही समजतच नाही. आजी, आई, बाबा सगळ्यांना झाडे लावण्याची कोण हौस! सगळे आवार झाडांनी अन् वेलींनी भरून गेले आहे. मधून मधून ताईची फुलझाडे आहेतच. मग आम्ही खेळायचे कुठे?

आंब्याच्या झाडाखाली बसून संदीप असा विचार करत होता. त्याच्या मनात आले, एखादी छानशी कुऱ्हाड मिळाली तर! त्या कुऱ्हाडीने सगळी झाडे, वेली तोडून मोकळे मैदान करता येईल. त्याला आठवले, की घरात एक कुऱ्हाड पडलेली आहे.

संदीपने कुऱ्हाड आणली आणि तो प्रथम वेली तोडायला निघाला. वेलींवर रंगीबेरंगी फुलपाखरे बसली होती. मधमाशा फुलांतील मध गोळा करत होत्या. आता तो वेलीवर घाव घालणार, इतक्यात एक छोटे फुलपाखरू त्याच्या खांद्यावर बसले अन् त्याच्या कानात गाऊ लागले—

*''थांब मुला रे थांब मुला, तोडू नको तू वेलीला ।*
*अन्नदात्री ही वेल आमुची*
*बाळे आम्ही तिची छानशी*
*उगाच का तोडिसी तिला, थांब मुला रे थांब मुला ।''*



संदीप चपापला. त्याच्या हातातल्या कुऱ्हाडीची पकड जरा ढिली झाली. इतक्यात एक छोटी मधमाशी त्याच्या कानाजवळ गुणगुणू लागली —

*''वेलीवर जर घाव घालिशी*
*गंमत होईल तुझीच खाशी*
*गोड गोड मध मिळावयाचा*
*कसा तुला रे सांग मुला, थांब मुला रे थांब मुला।''*

संदीपला पटले. खरेच, वेली खूप उपयोगी असतात, वेली नकोतच तोडायला. मोठी मोठी झाडेच तोडावीत. म्हणजे क्रिकेटला मोठे मैदान मिळेल.

तो प्रथम पेरूच्या झाडाकडे वळला. तोच फांदीवरून एक हिरवागार पोपट उडत उडत त्याच्याजवळ आला. तो म्हणाला, ''अरे मुला, तू हे झाड का तोडतोस? आम्ही छोटे पक्षी या झाडाच्या फळांवर आपले पोट भरतो. तू काय आम्हांला उपाशी ठेवणार? अरे तुलादेखील गोडगोड पेरू हे झाडच देते ना? तरी तोडणार तू ह्याला?''

''ठीक आहे बाबा, नाही तोडत पेरूचं झाड,'' असे म्हणून संदीप आंब्याच्या झाडाकडे वळला. आंब्याच्या पानांआड दडून बसलेली कोकिळा पुढे आली. आपल्या मंजूळ आवाजात ती म्हणाली, ''अरे संदीप, तू काय हे आंब्याचं झाड तोडणार? मग तुला आवडणाऱ्या कैऱ्या आणि गोड गोड आंबे कुठून मिळणार? तसंच माझं गोड गाणं तुला आवडतं ना? या आंब्याच्या झाडावर बसूनच तर मी गाते.''

संदीप म्हणाला, ''खरंच हं! आंब्याचं झाड तोडून कसं चालेल? मग करावं तरी काय?''

इतक्यात गुलमोहोराच्या झाडावरून भारद्वाज आपले पंख फडफडवीत आला आणि म्हणाला, ''वाहवा! संदीप, कुऱ्हाड झाडावर चालवणार वाटतं? पण तुला माहीत आहे ना, की झाडांमुळे ओलावा राहतो, जमिनीची धूप थांबते, झाडांमुळेच पाऊस पडायला मदत होते.''



संदीप म्हणाला, ''हो हो! बरोबर. शाळेत बाईंनी सांगितलंय ना आम्हांला तसं!''

मग त्याने विचार केला, हे कडुनिंबाचे झाड तोडायला आता हरकत नाही. कारण त्याचा काहीच उपयोग नाही.

तो कडुनिंबाच्या झाडाजवळ आला. कडुनिंबाची कोवळी कोवळी पाने मोठी छान दिसत होती. छोट्या छोट्या निंबोण्या लटकत होत्या. कडुनिंबाच्या झाडाने संदीपला पाहिले. त्याच्या हातातली कुऱ्हाड पाहिली. ते म्हणाले, ''मला तोडणार आहेस तू? तोड बापडा. पण तोडण्यापूर्वी एकदा बोलायची संधी देणार का मला?''

संदीपला वाटले, बिचारे आता शेवटचेच बोलणार आहे. बोलू दे.

''सांग तुला काय सांगायचं आहे ते. पण लौकर हं.''

कडुनिंबाचे झाड म्हणाले, ''संदीप, तू शाळेत जातोस ना? माणसाला जगण्यासाठी प्राणवायू लागतो, हे माहीत आहे ना तुला?''

''हॅं! हे काय विचारणं झालं? एवढंही माहीत नाही काय मला?''

''मग असं पहा संदीप, आम्ही झाडं तुम्हांला प्राणवायू देतो. हवा शुद्ध ठेवतो, सावली देतो आणि आम्हांलाच तू मारून टाकणार?''

संदीपला हे सगळे पटले आणि त्याच्या मनात आले — या सुंदर वेली, ही फुले-फळे आणि शुद्ध हवा देणारी झाडे तोडायची?

छे, छे! हे तर आपले मित्र.



अन्नदात्री — अन्न देणारी. खाशी — विशेष.

## स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.

(१) 'खेळणार कुठे' हा प्रश्न संदीपला का पडला?

(२) संदीपला कुऱ्हाड कशासाठी हवी होती?

(३) झाडे तोडण्यासाठी निघालेल्या संदीपला कोण कोण भेटले?

- **खालीलपैकी योग्य पर्याय लिहा.**

संदीपने वेली का कापल्या नाहीत?

(क) वेलींवर फुलपाखरे बसली होती.

(ख) मधमाश्या फुलांतील मध गोळा करत होत्या.

(ग) वेली उपयोगी असतात.

- **अर्थ सांगून वाक्यात उपयोग करा.**

पकड ढिली होणे, संधी देणे.

- **वेली व वृक्ष यांना एकेक समानार्थी शब्द सुचवा.**

- **आपले मित्र कोण हे पाठाच्या आधारे थोडक्यात लिहा.**

**व्याकरण**

ज्या शब्दसमूहातून अर्थ कळतो त्याला **वाक्य** असे म्हणतात.

उदा. — 'वेलीवर रंगीबेरंगी फुलपाखरे बसली होती'.

- **पुढील शब्दसमूहांपैकी वाक्ये कोणती ते लिहा.**

(१) सकाळची वेळ होती.

(२) आमच्या नदी आवार

(३) झाडे आपले मित्र आहेत.

- **खालील शब्द जुळवून एक वाक्य तयार करा.**

एक, त्याच्या, बसले, फुलपाखरू, खांद्यावर, छोटे.



# ३. चांदोबास पत्र

वंदना कांबळे
उदगीर,
दि. १ मे, १९९१.

*प्रिय चांदोमामा,*

सप्रेम नमस्कार,

मामा, तुला पत्र लिहावं असं कितीतरी दिवसांपासून मला सारखं वाटत होतं, पण जमलंच नाही. आज मात्र तुला पत्र पाठवायचंच असं ठरवून लिहायला बसले आहे.

अक्षरशः लक्षावधी किलोमीटर अंतरावरून या पत्रातून मी तुझ्याशी बोलत आहे. तू इतक्या दूर असलास ना, तरी आम्हांला नेहमी जवळच वाटत आला आहेस. पृथ्वीवरील आम्हां सर्व मुलांचा तू आवडता मामा आहेस. लहानपणी आम्ही तुझ्याजवळ टोपी मागत



फिरायचे. "आज नाही, उद्या या", असं तू म्हणायचास, तो उद्या कधी उगवलाच नाही. जेवताना तुझ्या तूपवाटीत माशी पडायची आणि तू उपाशी राहायचास. त्या वेळी आम्हांला खूप वाईट वाटायचं. निंबोणीच्या झाडाआड तू लपायचास ना, त्या वेळी तुला हुडकून काढण्यात फार मजा यायची. तू सापडलास, की आम्हांला किती आनंद व्हायचा म्हणून सांगू? आणि ए मामा, त्या निंबोणीच्या झाडाआडून किती छान दिसायचास रे तू?

पौर्णिमेच्या रात्रीचं तुझं मोहक रूप काय वर्णावं? तुझं चांदणं पृथ्वीवर पडलं, की सागराला भरती येते ना, त्याप्रमाणे त्या रात्री सगळी सृष्टीच शोभायमान होते. रानंवनं आनंदानं डोलू लागतात. नद्या, नाले, सरोवरं उल्हासानं खिदळू लागतात. मुलामुलींनाच नव्हे, तर येथील प्रत्येकाला तू मनापासून आवडतोस. सगळ्यांनाच जवळचा वाटतोस. आम्ही माणसं तुझ्या मोहात पडलोय हे काही खोटं नाही. म्हणून तर येथील माणसानं तुझ्यापर्यंत येण्यासाठी प्रयत्नांची शिकस्त केली. त्यासाठी त्यानं निरनिराळी याने तयार केली. त्यांत बसून तो

अंतराळामध्ये भिरभिर फिरला. तुझ्याकडे येण्याचा मार्ग त्यानं शोधला, आणि एक दिवस 'अपोलो' नावाच्या यानातून पोचलाच की तुझ्यापर्यंत. त्या यानात नील आर्मस्ट्राँग होता. तुला भेटला की नाही? खरं सांग हं चांदोमामा, त्या वेळी तुला काय वाटलं रे? पृथ्वीची मुलं भेटली म्हणून आनंद झाला असेल ना तुला? तुझ्यावरून ते आमच्याशी बोलले. तुझी भेट झाली म्हणून त्यांना आनंद झाला होता. त्यांचं ते बोलणं ऐकलं आणि तुला भेटल्याचा आम्हांला आनंद झाला.

चांदोमामा, पृथ्वीवरदेखील आनंद आहे रे. मौजच मौज आहे. मग येशील ना तू आमच्याकडे या पृथ्वीवर?

तुझी भाची
वंदना

पत्ता —
श्री. चांदोमामा
द्वारा आकाश

शिकस्त — पराकाष्ठा.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) मुलांना चांदोमामाचे आकर्षण का वाटते?
  (२) पौर्णिमेच्या रात्री चांदणे पडल्यावर पृथ्वीवर काय काय घडते?
  (३) चांदोमामाकडे प्रथम कोण व कसा पोहोचला?

- **वाक्यात उपयोग करा.**

शिकस्त करणे, खिदळू लागणे.

- **'पत्राच्या मायन्यात' कोणत्या गोष्टी लिहाव्या लागतात ते सांगा.**
- **तुमच्या मित्राला पत्र लिहून तुम्ही परीक्षेत पास झाल्याचे कळवा.**

### व्याकरण

प्रत्येक वाक्यात आपण **कोणाबद्दल** तरी **काही** बोलतो, यावरून वाक्याचे दोन भाग पडतात. कोणाबद्दल बोलतो; म्हणजे कोणाला तरी उद्देशून बोलतो. या पहिल्या भागाला **उद्देश्य** म्हणतात. या उद्देश्याबद्दल आपण काही बोलतो म्हणजे आपण काही विधान करतो. या दुसऱ्या भागाला **विधेय** असे म्हणतात.

| उदा. | उद्देश्य | विधेय |
|---|---|---|
| | चांदोमामा | आम्हा मुलांचा आवडता आहे. |
| | वंदनाने | चांदोमामाला पत्र लिहिले. |

- **पुढील वाक्यांतील उद्देश्य व विधेय लिहा.**

(क) पंडित नेहरू मुलांचे आवडते होते.
(ख) सानेगुरुजी मुलांना छान छान गोष्टी सांगत.



# ४. आभाळाची अम्ही लेकरे

आभाळाची अम्ही लेकरे, काळी माती आई
जात वेगळी नाही आम्हा धर्म वेगळा नाही ॥
श्रमगंगेच्या तीरावरती
कष्टकऱ्यांची अमुची वसती
नाव वेगळे नाही आम्हा गाव वेगळा नाही ॥
इमान आम्हा एकच ठावे
घाम गाळुनी काम करावे
मार्ग वेगळा नाही आम्हा स्वर्ग वेगळा नाही ॥
माणुसकीचे अभंग नाते
अम्हीच अमुचे भाग्यविधाते
पंथ वेगळा नाही आम्हा संत वेगळा नाही ॥
कोटि कोटि हे बळकट बाहू
जगन्नाथ-रथ ओढुन नेऊ
आस वेगळी नाही आम्हा ध्यास वेगळा नाही ॥



**श्रमगंगा** — श्रमकार्य हीच गंगा. **अभंग** — न तुटणारे. **जगन्नाथ-रथ** — सर्वांनी मिळून करायचे अवघड कल्याणकारी काम. **आस** — इच्छा.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) कष्टकऱ्याचे इमान आणि नाते कोणते असते?
  (२) कष्टकऱ्यांना कोणता ध्यास लागलेला असतो?
  (३) कष्टकऱ्यांची आई कोण? तिची लेकरे कोठे राहतात?

- **अर्थ लिहा व वाक्यात उपयोग करा.**
  लेकरे, मार्ग, बाहू, भाग्य.

- **तीर आणि अभंग या शब्दांचे दोन अर्थ लिहा.**

- **खालील शब्दांच्या अर्थातील फरक स्पष्ट करा.**
  संत — संथ, इमान — इनाम, माग — मार्ग, मती — माती.

- **खालील विधानांशी जुळणारे या पाठातील शब्दसमूह निवडा व लिहा.**
  (क) आम्ही आमचा उत्कर्ष स्वतःच साधतो.
  (ख) आम्ही सर्व मिळून अवघड काम पूर्ण करू.

### व्याकरण

वस्तूंच्या (व्यक्ती, पशू, पक्षी, झाडे, पदार्थ, भाव इ.) नावाला **नाम** असे म्हणतात.

उदा. — सिंह, घार, पिंपळ, दगड, वास, लोभ.

- **खालील वाक्यांतील नामे ओळखून लिहा.**
  (अ) आम्ही आभाळाची लेकरे आहोत.
  (आ) काळी माती आमची आई आहे.
  (इ) आम्ही घाम गाळून काम करतो.
  (ई) आम्ही आमच्या बळकट बाहूंनी जगन्नाथाचा रथ ओढून नेऊ.

# ५. प्राण वाचवले

तानबा आता ऐंशी वर्षांचा झाला होता. आयुष्यभर त्याने कष्ट केले. कातडी कमावली, चपला, जोडे तयार केले आणि कुटुंब पोसले. त्याला दोन मुले होती. त्यांना त्याने शिकवले. त्यांतल्या एकाने कानपूरला स्वत:चा कातडी कमवायचा मोठा कारखाना काढला. दुसरा लष्करात वरच्या हुद्द्यावर चढला होता. तानबाला आपल्या कर्तृत्वामुळे खूप समाधान वाटत होते. मुले त्याला त्यांच्याजवळ राहायला बोलावत होती, पण तानबा गाव सोडून जायला तयार नव्हता. या लहानशा गावाने मला पोसले आहे, मोठे केले आहे. या गावचे ऋण आहे माझ्यावर. माझ्या गावातच खूप करमते मला. तुमच्याकडे येणार नाही, असे तो मुलांना सांगे.

आता त्याला पैशाची कमी नव्हती. तरी तो स्वस्थ बसेना. शाळेत जाणाऱ्या शेजारच्या बनीचे फाटलेले बूट तो शिवून देई. शिवरामच्या चपलेचा अंगठा ठोकून देई. शहरात मुलाखतीला जायला निघालेल्या नीळकंठाच्या बुटाला तो चकचकीत पॉलिश करून देई. ही सगळी नवी पिढी तानबाला खूप मान देत असे.

तानबा स्वत:देखील लिहायला आणि वाचायला शिकला होता. आकाशवाणी आणि दूरदर्शनवरच्या बातम्या तो नियमाने ऐकत होता. माणसे माणसांच्या जिवावर उठलेली पाहत होता. निरपराध लोकांची हत्या झालेली ऐकत होता आणि अस्वस्थ होत होता. शहरात गुंडगिरी करणारे, भोवतालच्या लहान-सहान गावांनाही उपद्रव देत. तानबाच्या गावालाही त्याची झळ पोहोचत होती. समाजात गुंडगिरी वाढलेली आहे, याचे त्याला अतोनात वाईट वाटे. तानबा अतिशय दु:खी, कष्टी होत होता. त्याचे कौलारू घर गावाच्या वेशीवरच होते. रात्री उशिरापर्यंत त्याला झोप लागेना. तो उठून पडवीत येई. शांत झोपलेल्या

गावाकडे समाधानाने पाही. पण मध्येच आठवण झाली, की त्याचे मन विषण्ण होई.

एका रात्री तो असाच पडवीत उभा होता. पावसाळ्याचे दिवस होते. आभाळ भरून आलेले होते. वातावरणात श्वास गुदमरत होता. अधूनमधून भुंकणाऱ्या कुत्र्यांच्या दुरून येणाऱ्या पुसट आवाजाखेरीज सर्वत्र सामसूम होती. ती भेडसावणारी शांतता तानबाच्या मनाला उगीचच कुरतडत होती.

तेवढ्यात दूरवर माणसांची हालचाल दिसू लागली. 'एवढ्या रात्री कोण येतय गावाकडं? शहराच्या गुंडांशिवाय कोण भटकणार, आपल्या गावाकडे एवढ्या रात्री? काय उद्देश असेल यांचा बरं?' तानबा स्वत:शीच म्हणाला. तानबाने दूरवर नजर फेकली. त्यांच्या हातांत काठ्या आणि बंदुकीही असाव्यात, असे जाणवत होते. तानबा ते



जाणून घ्यायला उत्सुक झाला. पण एवढ्या रात्री घराबाहेर पडायचे ते कशासाठी? त्या टोळक्याला आपली शंका आली तर ते आपला जीव घ्यायलाही कमी करणार नाहीत. मग त्याला कल्पना सुचली. आपण शेजारच्या शहरात बाजाराला जायला निघालोत पायी पायी असे भासवूया. रात्री निघालो की सकाळपर्यंत पोहोचेन असे सांगूया.

तानबाने लगेच पिशवी काढली. त्यात काही जुने,काही नवे असे लहानमोठे जोडे, चपला भरल्या आणि ती पिशवी खांद्यावर टाकून तो त्या माणसांच्या दिशेने निघाला.

त्या माणसांचे बोलणे त्या शांत वातावरणात त्याला आता स्पष्ट ऐकू येत होते. गावच्या सरपंचाला मारण्याचा त्यांचा मनसुबा त्याने ताडला. तो चिंतित झाला. गावचा सरपंच हा देवमाणूस होता. गावची तो निस्वार्थपणे सेवा करीत होता. गावाच्या निराधार लोकांना त्याचा खूप आधार होता. गावची मुले शिकावीत, गावचे आरोग्य चांगले राहावे, शेती, उद्योग चांगले चालावेत म्हणून तो खूप झटत होता. गुंडांचा बंदोबस्त व्हावा म्हणून तो सतत शहरात जायचा. शासनाकडे त्यासाठी मदत मागायचा. अनेक गुंडांना त्याने पोलिसांच्या स्वाधीन केले होते. कुणाच्याही मालमत्तेचे नुकसान त्याने होऊ दिले नव्हते.

अनेकदा प्रयत्न करूनही केवळ सरपंचांच्या जागरूकतेमुळे गावच्या कुणासही गुंड लुबाडू शकले नव्हते. म्हणूनच सरपंचांचा काटा काढायचा त्यांनी कट रचला होता. मग अशा हितकारी सज्जनाची हत्या होऊ द्यायची? त्याला कल्पनाही नसेल या दुष्टांच्या मनसुब्याची! पण आता काय करायचे? आपले प्राण आपण दिले तरी पुढला घात टळायचा नाही. तो मनात सारखा विचार करीत होता.

तेवढ्यात ते दहा-बारा दणकट माणसांचे टोळके त्याच्या पुढ्यातच येऊन दाखल झाले. त्यांनी तानबाला अडवले. तू कोण? कुठला? कुठे

निघालास एवढ्या रात्री? वगैरे प्रश्न त्यांनी तानबाला खडसावून विचारले.

तानबा हात जोडून म्हणाला, ''मी त्या पलीकडच्या शहरात राहतो. जोडे, चपला शिवतो आणि पोट भरतो. या गावच्या सरपंचांनी मला काही लहान मुलांच्या चपला आणि स्वत:साठी जोडा शिवून मागितला होता. या चपला आणि जोडा घेऊन मी त्यांच्याकडे गेलो होतो.''

तानबाने खांद्यावरची पिशवी काढली. त्यातले लहानमोठे चपलांचे जोड आणि बूट त्यांना दाखवले.

''पण सरपंचांच्या घराला कुलूप आहे. घरात कुणीच नाही! संध्याकाळपासून एवढी रात्र होईपर्यंत त्यांच्या दाराशी बसून होतो, पण ते आलेच नाहीत. शेजारचे मास्तर बाहेरून आलेले दिसले. त्यांना मी सरपंचांबद्दल तेवढ्यात विचारलं, तर ते म्हणाले, 'सरपंच सहकुटुंब लग्नासाठी परगावी गेलेत. आठ दिवसांनी परत येतील, म्हणून निघालो आता परत, हा माल घेऊन.''

त्या टोळक्याने सरपंचाला शिव्या घातल्या. त्यांचा म्होरक्या दातओठ खाऊन म्हणाला, ''अरेरे! सगळा बेत फसला! आता उद्या तो सरपंचच आपली गठडी वळील. म्हणजे आपण.....!'' लगेच ते टोळके पलीकडच्या झाडीत शिरले. तिथे मोटार उभी होती, त्यात बसले. मोटार वेगात दूर निघून गेली.

तानबाने समाधानाचा नि:श्वास टाकला. परमेश्वराचे मनात आभार मानले. हवा सुटली होती. बरेचसे मळभ निघून गेले होते. 'सरपंचांना सावध केलं पाहिजे,' त्याचे ओठ पुटपुटले आणि गावाकडे त्याने एक नजर टाकली.

गाव शांत झोपले होते.



## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) तानबा समाधानी का होता?
  (२) तानबा कोणकोणती कामे करत असे?
  (३) गुंडांचा उद्देश जाणण्यासाठी त्याने कोणती युक्ती योजली?
  (४) त्याने सरपंचाचे प्राण का वाचवले?

- **कारणे लिहा.**
  (१) काही गुंड काठ्या आणि बंदुकी घेऊन निघाले होते.
  (२) गुंडांचा म्होरक्या दात-ओठ खाऊ लागला.
  (३) तानबाने समाधानाचा निःश्वास टाकला.

- **खालील शब्दसमूहांचा अर्थ लिहून वाक्यात उपयोग करा.**
  कट रचणे, गठडी वळणे, नजर टाकणे, जिवावर उठणे.

- **पुढील प्रसंगी तुम्ही काय कराल?**
  (१) खोडकर मुले शाळेच्या बागेतील फुले तोडणार आहेत.
  (२) चावरा कुत्रा तुमच्या दिशेने येत आहे.
  (३) ज्वारीच्या पिकावर पाखरे बसत आहेत.

- **तुम्ही तानबा आहात असे समजून घडलेल्या प्रसंगाचे वर्णन मित्रास पत्राद्वारे थोडक्यात लिहा.**

- **खालील गटांतील 'पाहुणा' शब्द ओळखा व लिहा.**
  (१) सरपंच, चावडी, ग्रामसेवक, तलाठी.
  (२) दात, ओठ, पाय, पाया.



# ६. झेल्या

आता माझ्या आयुष्याला अगदी वेगळे वळण लागले आहे. इतके की कधी काळी माणदेशातील खेड्यात शिक्षक होतो हे मी विसरून जावे. तरीदेखील ते दिवस माझ्या आठवणीत आहेत. याचे कारण झेल्या. माझा एक विद्यार्थी.

मी त्या खेड्यात तीन महिन्यांकरताच होतो. पहिल्याच दिवशी सांधे खिळखिळे झालेल्या लाकडी खुर्चीवर मी बेतानं बसलो. एकवार साऱ्या वर्गावरून नजर फिरवली. चिल्ली-पिल्ली डोळे विस्फारून बसली होती. नवे मास्तर मारकुटे आहेत की चांगले आहेत, ते सारखे हिशेब आणि गणिते सांगतात, की अधूनमधून गोष्टीसुद्धा सांगतात, सारखे वाचन घेतात की गाणीसुद्धा म्हणायला लावतात, असे विचार त्या चिमण्या डोक्यांतून उड्या मारीत असावेत.

मी एकवार हळूच हसलो. टेबलावर रुळाखाली ठेवलेली हजेरी उघडली. चिनीमातीच्या दौतीत टाक बुडवला आणि म्हणालो, ''हं, हजेरी सांगा रे—''

''सदाशिव नारायण.''

आढ्याशी भिरभिरणाऱ्या चिमणीकडे पाहणारे पहिल्या नंबरचे एक पोरगे दचकले. टोपी सावरून अर्धवट उभे राहत ओरडले, ''हजर.''

''अब्दुल फत्तूभाई.'' लाल टोपीचा गोंडा हालला आणि चिरका आवाज उठला, ''हजर.''

होता होता शेवटचे नाव मी वाचले, ''जालंदर एकनाथ.''

आणि पोरे ओरडली, ''जालंदर न्हाय. झेल्या म्हना. त्यो साळंतच येत न्हाई!''

''का येत नाही रे?'' मी विचारले.

''कुनाला ठावं मास्तर, आनू का बोलावून?'' एकजणाने विचारले.

''घरी न्हाई त्यो, वड्यात चिंचा पाडतोय,''.... दुसऱ्या एकाने अचूक माहिती सांगितली. पोरांचा एकच गिल्ला चालू झाला, तसा मी रूळ टेबलावर आपटला. गोंगाट बंद झाला. मग तीन चांगली दणकट पोरे जालंदरला बोलावून आणण्यासाठी पाठवून दिली. ती मोठ्या वीरश्रीने गेली. पंधरा-वीस मिनिटे झाली असतील नसतील, ती जालंदरला घेऊनच आली. तो हिसकाहिसकी करत होता आणि पोरांनी त्याचे दंड घट्ट पकडले होते.

''सोडा त्याला. कुठं होतास रे?''

''वड्यात चिंचा पाडत हुता. आमी साळंत चल म्हनल्यावर शिव्या दिल्या मास्तर!'' पोरांनी माहिती दिली.

बटणे नसलेल्या कुडत्याला एका हाताने गळ्याशी धरून झेल्या बिथरल्या खोंडासारखा उभा होता. अंगाने किरकोळच. वयानेही फारसा नसावा. डोक्याला मळकट अशी पांढरी टोपी, अंगात कसले कसले डाग पडलेले, बाहीवर ठिगळ लावलेले कुडते, तांबड्या रंगाचे चौकडे असलेली गादीपाटाची चड्डी, तिचे दोन्ही अंगचे खिसे फुगलेले. त्यांत बहुधा चिंचा भरलेल्या असाव्यात.



सौम्य आवाजात मी विचारले, ''काय रे, शाळेत का येत नाहीस?''

''काम असतं घरी,'' गुर्मीत झेल्या बोलला. त्याचे दात काळे आणि किडलेले होते.

''कसलं?''

''म्हस हिंडवावी लागती. भाता वडावा लागतो. दादा म्हणतो, साळंत जाऊ नगस!''

झेल्याची ही सबब खोटी होती. कारण पहिल्या नंबराला असलेला सदा एकदम बोलला, ''लबाड बोलतोस! काय सुदीक करीत न्हाई ह्यो घरी — बापाला सांगतो साळंत मास्तर मारत्याती म्हणून, अन् गावात उनाडक्या करत हिंडतो! काय ऐकत न्हाई बापाचं!''

त्यावर झेल्याने रागारागाने सदाकडे बघितले आणि तो तोंडातल्या तोंडात पुटपुटला, ''चल की साळंबाहेर, जीवच घितो तुजा!''

झेल्या उनाड आणि धाडसी असल्याची माझी खात्री पटली, तरीसुद्धा मवाळपणानं मी म्हणालो, ''अरे, काम असलं तर विचारून जावं तेवढ्यापुरतं, मी काही नाही म्हणणार नाही तुला.''



झेल्याचा हिशेब चुकल्याचे त्याच्या चेहऱ्यावर दिसत होते. फोका आणि कानफडात घेण्याच्या तयारीने तो आला होता, पण मी प्रथमपासूनच पड घेतली होती.

''खिशात काय आहे तुझ्या?''

इतका वेळ बटणांच्या अभावी धरलेली मूठ एकदम सुटली आणि दोन्ही हात झेल्याने खिशात कोंबले, ''काय न्हाई.''

''चिंचा हायत्या मास्तर!'' असे ओरडून एक पोरगे जागेवरून उठून पुढे आले आणि झेल्याचे खिशात कोंबलेले हात हिसकू लागले, तसा तो केवढ्या तरी मोठ्यांदा ओरडला, ''अग आय आय ग, बोट मुरगाळलं माजं!''

मला माहीत होते की हा त्याचा कांगावा आहे.

''तू बाजूला हो रे. जागेवर बैस बघू,'' मी त्या पोराला दटावले आणि झेल्याला पुन्हा म्हणालो,

''झेल्या, काढ बघू काय आहे ते खिशात. चिंचा आहेत का? आण त्या. ठेव टेबलावर. मला हव्यात घरी न्यायला.''

काही वेळ तो तसाच उभा राहिला आणि मग बोलला,

''समद्या?''

''हो, आधी सगळ्या काढून टेबलावर तरी ठेव. मग मी लागेल तेवढ्या घेतो आणि तुला देतो राहिलेल्या!''

हिरव्यागार चिंचांचे मोठे मोठे आकडे भराभर खिशांतून काढून झेल्याने टेबलावर ठेवले.

''शाबास जालंदर! मास्तरांचं ऐकणारा शहाणा मुलगा आहेस तू. बैस आता जाग्यावर. शाळा सुटल्यावर तुला देईन मी यांतल्या चिंचा.''

झेल्या खुशीने हसला. त्याने एकवार चड्डी दोन्ही हातांनी वर ओढली आणि कुडत्याचा मोकळा गळा मुठीत पकडून तो जागेवर जाऊन बसला.

दुसरे दिवशी झेल्या पुन्हा गैरहजर राहिला. पहिल्या दिवसाची पुन्हा उजळणी करून त्याला बोलावून आणला. पण मी त्याच्यावर कधीच रागावलो नाही. एक आठवडा असा लोटला आणि मग मात्र झेल्या नियमित शाळेत येऊ लागला.

मुळात झेल्या एक चुणचुणीत पोरगा आहे, त्याच्या व्रात्यपणात बुद्धीची चमक आहे, कल्पकता आहे. तो कधी सुभाषबाबूंविषयी तर कधी नाना पाटलांविषयी प्रश्न विचारी. त्याला धाडसी माणसे फार प्रिय होती. त्यांच्याविषयी त्या बालमनात अपार आदर होता. आता तो अभ्यासाकडेही लक्ष पुरवू लागला.

हां हां म्हणता तीन महिने संपून गेले. मी झेल्यापाशी माझ्या जाण्याचे बोललो. तो क्षणभर खिन्न झाला, गप्प बसला आणि एकाएकी म्हणाला, ''मी येतो मास्तर तुमच्यासंगं!''

कुठे येणार होता तो माझ्याबरोबर? मी कुठे जाणार होतो हे माझे मलाच माहिती नव्हते, तर त्याला मी कुठे घेऊन जाणार होतो? मी हसलो आणि म्हणालो, ''अरे, वेडा काय तू? मी कुठं जाणार नाही. तालुक्याच्या गावी मोठ्या शाळेत मास्तर होणार आहे. तू इथं चार इयत्ता शीक आणि तिकडे ये. माझ्या वर्गात ये, सातवी पास हो, इंग्रजी शीक!''

झेल्याच्या बाळबुद्धीचे समाधान झाले. एक तांबड्या दांडीचा टाक आणि पेन्सिल माझी आठवण म्हणून मी झेल्याला दिली.

नंतर सर्वांना भेटलो. मुलांचा निरोप घेतला आणि पायीपायी निघालो. काही मुले वेशीपर्यंत आली आणि परतली. झेल्या मात्र परतला नाही. एक पिशवी घेऊन तो माझ्याबरोबर चालतच होता.

गावचा ओढा ओलांडला, हद्द संपली.

''झेल्या, जा तू आता.''

मी त्याच्या हातातून पिशवी घेतली आणि पाठीवरून हात फिरवला.



झेल्याने एकाएकी ओंजळीत तोंड झाकले आणि तो रडू लागला, "मास्तर, मी न्हाई जायचा आता त्या साळंत!"

त्याची समजूत काढून मी त्याला परत पाठवला.

अंगरख्याच्या बाहीने तो वरचेवर डोळे पुशीत होता आणि मागे वळून पाहत होता.

पाऊलवाटेची वळणे घेऊन अखेर झाडाझुडपाआड तो दिसेनासा झाला. तोंड वळवून मीही चालू लागलो.

त्यावर अद्याप झेल्या मला कधी भेटला नाही. तो आता कुठे असेल?



**वडा** — ओढा. **गिल्ला** — गोंगाट. **वीरश्री** — पराक्रम. **खोंड** — गोऱ्हा. **कुडते** — सदरा. **पड घेणे** — सौम्यपणे वागणे. **कांगावा** — खोटा आरडाओरडा. **व्रात्यपणा** — खोडसाळपणा.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

(१) नव्या मास्तरांना बघून मुलांच्या डोक्यात कोणते विचार येत असावेत?

(२) शाळेत गैरहजर असलेल्या मुलाचे नाव काय होते? त्याला कोणत्या नावाने ओळखले जाई?

(३) मास्तरांना निरोप देताना 'मी शाळेत जाणार नाही' असे झेल्या का म्हणाला?

- **कारणे द्या.**

(१) मास्तर खुर्चीवर बेताने बसले.

(२) झेल्या कुडत्याचा मोकळा गळा मुठीत पकडत असे.

(३) झेल्याने ओंजळीत तोंड झाकले आणि तो रडू लागला.

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**

दणकट, गुर्मी, सबब.

- **'झेल्या'विषयी तुमच्या शब्दांत पाच वाक्ये लिहा.**

## व्याकरण

- **खालील वाक्ये वाचा.**

१. **मी** पहाटे उठतो.

२. **तू** नियमितपणे शाळेला जा.

३. अंगणात फुलपाखरे उडत होती. **ती** रंगीबेरंगी होती.

या वाक्यांत मी, तू, ती या शब्दांचा उपयोग नामांसारखा झालेला आहे. नामांबद्दल ते शब्द आलेले आहेत. अशा शब्दांना **सर्वनामे** म्हणतात.

- **खालील वाक्यांतील सर्वनामे ओळखा.**

१. मी एकवार हळूच हसलो.

२. तो ओढ्यात चिंचा पाडतो.

३. तू शाळेत का येत नाहीस रे?

☆ ☆ ☆

# ७. आई

आई म्हणोनि कोणी आईस हाक मारी
ती हाक येई कानी मज होय शोककारी
नोहेच हाक, माते मारी कुणी कुठारी
आई कुणा म्हणू मी? आई घरी न दारी!
ही न्यूनता सुखाची चित्ता सदा विदारी
स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी.

चारा मुखी पिलांच्या चिमणी हळूच देई
गोठ्यात वासरांना ह्या चाटतात गाई
वात्सल्य हे पशूंचे मी रोज रोज पाही
पाहून अन्तरात्मा व्याकूळ मात्र होई
वात्सल्य माउलीचे आम्हां जगात नाही
दुर्भाग्य याविना का आम्हांस नाहि आई.





शाळेतुनी घराला येता धरील पोटी
काढून ठेविलेला घालील घास ओठी
उष्ट्या तशा मुखाच्या धावेल चुंबना ती
कोणी तुझ्याविना गे का ह्या करील गोष्टी ?
तुझ्याविना न कोणी लावील सांजवाती
सांगेल ना म्हणाया आम्हा 'शुभं करोति'

येशील तू घराला परतून केधवा गे
दवडू नको घडीला ये ये निघून वेगे
हे गुंतले जिवाचे पायी तुझ्याच धागे
कर्तव्य माउलीचे करण्यास येई वेगे
रुसणार मी न आता जरि बोलशील रागे
ये रागवावयाही परि येई येई वेगे.

**माते** — मला. **कुठार** — कुऱ्हाड. **विदारी** — विदीर्ण करते, अंतःकरणाचे तुकडे करते. **केधवा** — केव्हा.

### स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) कोणती दृश्ये पाहिल्यावर मुलाला आपल्या आईची आठवण होते?
  (२) आई नसल्यामुळे मुलगा कोणत्या गोष्टीस मुकला आहे?
  (३) रोज सायंकाळी आई काय करत असे?
- **खालील शब्दांचे अर्थ लिहून वाक्यात उपयोग करा.**
  न्यूनता, स्वामी, सांजवात, व्याकूळ.
- **'स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी' या ओळीच्या आधारे एक परिच्छेद लिहा.**
- **खालील अर्थ दाखविणारे कवितेतील शब्द लिहा.**
  गाईचे पिल्लू, मालक, संध्याकाळचा दिवा, तोंड, आई.
- **या पाठाच्या आधारे मुलाच्या मनाची व्याकुळता तुमच्या शब्दांत लिहा.**

**व्याकरण**

(अ) **ही** माझी बहीण आहे. (आ) **जो** श्रम करतो **तो** यश मिळवतो.
(इ) **कोण** आहे रे तिकडे? (ई) पिशवीत **काय** ठेवलेस?
या वाक्यांतील ही, जो, तो, कोण, काय हे शब्द सर्वनामे आहेत.

- **खालील वाक्यांतील मोकळ्या जागी योग्य सर्वनामे लिहून वाक्ये पूर्ण करा.**
  (अ) .................... अभ्यास करतो .................... यशस्वी होतो.
  (आ) आज सकाळी आईने तुला .................... दिले?
  (इ) .................... माझी आई आहे.
  (ई) उदया .................... येणार आहे?

# ८. माया

सात-आठ वर्षांची झिनी आज पहाटे उठली नाही. तिला बरे नव्हते. एरवी ती पहाटेच उठायची. गोळा केलेल्या काटक्या पेटवायची. मातीच्या वाडग्यात तीन-चार कप पाणी ठेवायची आणि बकरीचे दूध काढायला जायची. अंगणात एक बसकट काटेरी झुडूप होते. त्याच्या बुंध्याला नारळाच्या दोरीने शेळी बांधलेली असायची नि तिच्या शेजारीच एक गोजिरवाणे पिलू असायचे. त्या पिलाला आई नव्हती. ही शेळी त्या पिलाला पाजायची, चाटायची, बरोबर चरायला न्यायची. तेही सारखेसारखे तिच्या पायापायांत घुटमळायचे. त्याच्या आईनेही केले नसते, एवढे प्रेम ती शेळी करायची त्या पिलावर. म्हणतात ना, 'माय मरो पण मावशी जगो'.

झिनीचा त्या पिलावर खूप जीव होता. ती त्याला खांद्यावर घ्यायची, मांडीवर झोपवायची. रोज ढोरे चरायला नेली की त्या पिलामागेच असायची. पिलाला ती 'पिठी' म्हणायची. भाकरीच्या पिठासारखी पांढरी आणि गोंडस होती ती. पिठी एखादे दिवशी दूध प्यायची नाही. बसूनच राहायची, नुसती कोठेतरी पाहत, उगीचच तोंडात नसलेला चारा चावत. मग झिनी म्हणायची, ''आईची आठवण झाली असेल तिला.'' झिनीला तरी कुठे होती आई? पण तिचा बाप गेनू तिला खूप लाडाने वागवायचा. तिला आईची आठवणच होऊ द्यायचा नाही.

झिनी आणि पिठी अगदी एकजीव होत्या जणू. पिठी दूध प्याली नाही तर झिनीही भाकरी खायची नाही.

आज झिनीला बरे नव्हते. ती पहाट झाली तरी बाहेर आली नाही. पिठीच्या पाठीवरून तिचा हात फिरला नाही. पिठी दूध प्यालीच नाही. मधूनच दबक्या आवाजात 'ब्यँ ब्यँ' करायची. झिनीने मग पडल्या

पडल्या झोपडीतूनच पिठीला आवाज दिला आणि पिठी उड्या मारत झोपडीत आली. झोपलेल्या झिनीच्या तोंडाला तिने तोंड लावले आणि क्षणभर ती झिनीकडे पाहत राहिली.

बाजूला एका फाटक्या सुपात तरोट्याची भाजी पडलेली होती. त्यातली काही कोवळी कोवळी पाने झिनीने हात लांब करून उचलली आणि पिठीला खाऊ घातली. पिठीने ती भरभर जबड्यात भरून घेतली. झिनीला खूप आनंद झाला. पिठीदेखील तुडुक तुडुक उड्या मारत झोपडीभर फिरली आणि पुन्हा झिनीजवळ येऊन उभी राहिली. झिनीचा आखूड मळकट झगा तिने तोंडात धरून ओढला. झिनीने तो हळूच सोडवून घेतला. आधीच फाटला होता तो कुठे कुठे.

तेवढ्यात बापाने झिनीला हाक मारली. झिनी उठली. बाहेर जाऊन मातीत गाडलेल्या रांजणातले पाणी तिने एका टिनपाटाने बाहेर काढले. चूळ भरली. तोंडावरून हात फिरवला. पिठी ते सगळे न्याहाळत होती. मध्येच झिनीच्या पायात जाऊन उभी राहत होती.



आज झिनीच्या बापानेच ढोरे चरायला नेली. ती शेळी आणि पिठीही चरायला गेल्या. झिनी झोपडीबाहेरच उभी होती. शेळीच्या पाठोपाठ जाणाऱ्या पिठीकडे पाहत होती. समोरच पहाडांची रांग होती. जांभळाची, चिंचेची आणि आंब्याची काही झाडे होती. बाकी सगळे सागवानी जंगल. जंगल होते मात्र खूप दाट. पहाडावर ढोरांच्या फिरण्याने कितीतरी पायवाटा पडलेल्या होत्या, वळत वळत जाणाऱ्या, कुठेतरी एकदम गडप होणाऱ्या.

आज वारा नव्हता. कुठे कुठे ढग दिसत होते. झिनीचा बाप ढोरे घेऊन निघाला. मध्येच शिवराळ आवाज काढीत इकडे तिकडे भटकणाऱ्या ढोरांना तो रस्त्यावर हाकी.

जंगलात जाणारी वाट वळत वळत गेली. आता ढोरे, पिठी आणि झिनीचा बाप दिसेनासे झाले. मग झिनी झोपडीत गेली. चुलीत काड्या घातल्या. गाडग्यातले पीठ कोपरात काढून भिजवले. भाकरी हातावर थापली अन् तव्यावर टाकली. अंगणात एक गोटा मातीत बसवला



होता. त्याच्यावर तिने वाळलेल्या लाल मिरच्या पाणी घालून वाटल्या. तिखटाचा गोळा भाकरीवर ठेवला अन् एका पालवात भाकरी बांधली. तेवढ्यात महादूकाका आलाच.

''झिने, तुझ्या बापासाठी भाकरी बांधली का वं?''

झिनीने भाकरी समोर केली. महादू भाकरी घेऊन निघून गेला.

झिनीला आता काय करावे ते सुचेना. पिठी चरायला गेलेली. तिला करमेना. ती संध्याकाळकडे डोळे लावून बसली होती.

पहाडात दिवस लवकर बुडतो. ती पिठी गेल्याच्या वाटेकडे आता दूरदूर पाहत होती. ढोरे दिसली. तिचा बापही दिसला. तिला खूप हुरूप आला. छोटीशी पिठी कुठून दिसणार दुरून?

पण छे! ती जवळूनही दिसली नाही. सगळी ढोरे आपापल्या वाटेने पांगली. शेळीदेखील झुडपाशी येऊन उभी झाली. गवती छपरावर काठी टाकून गेनू झिनीजवळ आला, पण पिठी कुठेय? झिनी कावरीबावरी झाली.

''पिठी कुठंय?'' तिने बापाला विचारले.

''आज कुठंतरी भटकली ती. दिवस कलला तेव्हा तिले खूप धुंडलं म्या, पन दिसलीच नाही!'' बापाने सहज सांगितले.

पण झिनीने लगेच गळा काढला.

''वाघानं खाल्ली असन का?'' तिने बापाला जोरात प्रश्न केला आणि जंगलात जाणाऱ्या त्या वाटेकडे धावत सुटली.

बाप गोंधळला. झिनीचे पिठीवरचे प्रेम त्याला ठाऊक होते. तो झिनीमागे धावला. इवल्याशा झिनीला पकडून त्याने कडेवर घेतले.

''आता अंधारात कशी दिसन पिठी? उद्या पहाटेसच जाईन मी तिले शोधायले.''

झिनीने रडून रडून आकांत केला. बापाने खूप खूप समजावले, पण उपयोग झाला नाही. झिनी जेवली नाही. रडून रडून थकली आणि

केव्हातरी तिचा डोळा लागला.

झिनीचा बाप पहाटेसच उठला. जंगलात गेला. पिठीला दऱ्याखोऱ्यांत शोधू लागला. फिरता फिरता सूर्य डोक्यावर आला. घामाने गेनू डबडबून निघाला. पण पिठी कुठे दिसेना. आज भाकरही नव्हती. तो थकून गेला. एका दरीच्या उंच टोकावर मोहाच्या झाडाखाली टेकला.

आणि पुढे दरीत पाहतो तर काय, पिठी उभी होती एका दगडावर. झिनीच्या बापाला खूप आनंद झाला. तो धावत अर्धी दरी उतरला, पण एकदम थबकला. पिठीसमोरच्या दाट झुडपाआड वाघीण उभी होती. ती पिठीकडेच पाहत होती. तिचे क्रूर डोळे पाहून झिनीचा बाप जागीच थिजला. पिठी खालच्या आवाजात 'ब्यँ ब्यँ' करीत पुढे सरत होती. वाघिणीच्या ती अगदी जवळ गेली.

वाघिणीने घशातल्या घशात 'गुर्र गुर्र' आवाज केला. पिठीने आपले तोंड उंचावून वाघिणीच्या तोंडाला लावले आणि एकदा नव्हे तर दोनदा, तीनदा. मग वाघीण जरा जोरानेच गुरगुरली आणि झिनीच्या





बापाने एकदम डोळे मिटले. संपले पिठीचे आयुष्य. डोळ्यापुढे झिनी दिसली. पिठीसाठी आक्रोश करणारी झिनी.

पण इलाज नव्हता. क्षणार्धात त्याने डोळे उघडले आणि पाहतो तर काय! वाघीण तिथे नव्हती. त्याने दूरवर इकडे तिकडे पाहिले. वाघीण कुठेच दिसत नव्हती. पिठी मात्र वाघीण उभी होती त्या दिशेला पाहत दबक्या आवाजात 'ब्यँ ब्यँ' करीत होती.

झिनीचा बाप धावतच दरी उतरला. निरागस पिठीला त्याने एकदम कवेत घेतले. छातीशी घट्ट धरले. छातीशी झिनीच होती जणू. झिनीच!

**शिवराळ** — शिव्यांनी युक्त. **कोपरात** — परातीत. **गोटा** — पसरट दगड. **पालव** — फडके. **निरागस** — निष्पाप. **कवेत घेणे** — कवटाळणे.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

(१) झिनीचा पिठीवर जीव होता हे कसे दिसून येते?

(२) झिनीने बाहेर येऊन पिठीच्या पाठीवर हात फिरवला नाही, तेव्हा पिठीने काय केले?

(३) झिनी जंगलाकडे जाणाऱ्या वाटेने धावत का सुटली?

(४) झिनीने भाकरी आणि तिखटाचा गोळा कसा तयार केला?

(५) जंगलात पिठी दिसल्यावरही झिनीचा बाप तिच्याकडे का गेला नाही?

- **कोण कोणाला म्हणाले?**

(१) "तुझ्या बापासाठी भाकरी बांधली का वं?"

(२) " उद्या पहाटेसच जाईन मी तिले शोधायले."

(३) " वाघानं खाल्ली असन का?"

- **माणसाने प्राणिमात्रावर प्रेम करावे, हे सांगणारी ही गोष्ट तुमच्या मित्राला तुमच्या शब्दांत सांगा.**

**व्याकरण**

- **नामाबद्दल विशेष माहिती सांगणारा शब्द म्हणजे विशेषण.**

उदा. (क) **लाल** पतंग आकाशात भरारी मारू लागला.

(ख) **शहाणी** मुले मनापासून अभ्यास करतात.

(ग) **गोड** पदार्थ मुलांना आवडतात.

या वाक्यांतील लाल, शहाणी, गोड हे शब्द विशेषणे आहेत.

- **खालील वाक्यांतील विशेषणे ओळखा.**

(क) अंगणात काटेरी झुडूप होते.

(ख) गोजिरवाणे पिल्लू पायांत घुटमळत होते.

(ग) एका फाटक्या सुपात भाजी पडलेली होती.



# ९. फुलपाखरू आणि पतंग

इकडे तिकडे फुलांवर उड्या मारणाऱ्या फुलपाखराचे लक्ष आकाशात भरारी घेणाऱ्या पतंगाकडे गेले.

तो पतंग खूप मोठा तांबड्या-निळ्या पट्ट्यांचा होता. त्याचे नाक पसरट आणि डोळे मोठ्ठाले होते. त्याचे शेपूट लांबलचक आणि नखरेबाज होते. असा तो मोठा पतंग आकाशात उंच उंच उडायचा. हवेत भराऱ्या मारायचा. दुसरा एखादा पतंग समोर आला रे आला, की आपल्या मांजाने त्याला सर्रकन कापायचा.

'आहे का माझी बरोबरी करणारा कोणी? मी ढगांना गाठू शकतो. पक्ष्यांना हरवू शकतो.' स्वत:शीच पतंग कधीकधी बोलायचा. अभिमानाने, अहंकाराने, गर्वाने त्याची छाती फुगून यायची.

आकाशात एकदा असाच तो लहरत होता. त्याचे लक्ष एकदम खाली बागेतल्या रंगीबेरंगी फुलांकडे गेले. त्या फुलांवर नाचत बागडत होती, निरनिराळ्या रंगांची इटुकली पिटुकली फुलपाखरे.

वारा जरा कमी झाल्याबरोबर तो पतंग खाली आला. बागेतल्या झाडाझुडपांकडे झेपावला.

त्याला बघून एक बहुरंगी फुलपाखरू म्हणाले, "अरे पतंगदादा, आकाशात किती वर उडत गेला होतास रे! चांदण्यांनाच जणू भेटायला चालला होतास. आणि एक पतंगही काटलास तू!"

"तर! आणि एकच काय, आतापर्यंत पन्नास पतंग काटलेत. सगळ्यात माझा नंबर पहिला, मग उंच उडण्यात मी कसा मागे राहीन?" पतंगाने झोकात म्हटले.

दुसऱ्या एका फुलपाखरानेही पतंगाला म्हटले, "तू खरंच कमाल करतोस हं! वर गेल्यावर अगदी लुकलुकणाऱ्या ताऱ्यासारखाच दिसलास रे. फक्त तांबड्या-निळ्या शेपटीमुळं मी तुला ओळखलं."

पतंगाने त्या फुलपाखराकडे बघून हसत म्हटले, ''तू हुशार दिसतोस हं फुलपाखरा. चलतोस का माझ्याबरोबर आकाशात? अगदी ढगांतून फिरवून आणतो बघ तुला.''

''मी? आणि तुझ्याबरोबर आकाशात? नाही रे बाबा!'' त्या फुलपाखराने आपल्या पंखांची उघडझाप करीत म्हटले, ''अरे पतंगदादा, तू एवढा मोठा, मी किती छोटा, माझे हे पंख किती चिमुकले! मी आपला इथं खालीच बरा.''

''हॅत, अगदीच रड्या आहेस तू!'' म्हणत पतंगदादाने पुन्हा आकाशाकडे झेप घेतली. थोडा वेळ पतंग उंच उंच जात राहिला.



पहिले फुलपाखरू दुसऱ्याला म्हणाले, ''हा पतंग आता त्या हत्तीएवढ्या मोठ्या ढगाला जाऊन धडकणार रे!''

..... आणि खरोखरच पतंगाला जोराचा झटका बसला. पतंग एकदम पावसाच्या थेंबासारखा खाली आला. फटकन जमिनीवर आदळला.

''पतंगदादा, कुठं लागलं नाही ना तुला? फाटला-बिटला नाहीस ना?'' दुसऱ्या फुलपाखराने अगदी काळजीच्या सुरात विचारले.

''नशिबानंच वाचलो बाबा. आमच्या मालकानं दोऱ्याला एकदम झटका दिला. धाडकन आदळलोच मी तर जमिनीवर.''

''बरं झालं दादा, मी तुझ्याबरोबर उंच आकाशात भराऱ्या मारायला आलो नाही ते. माझ्या पंखांचा पार निकाल लागला असता,'' फुलपाखरू म्हणाले.

''तुझी हिंमतच तेवढी. माझ्यासारखी झेप घेऊन तर बघ...''

''पतंगदादा, तू उंच आकाशात भराऱ्या मारतोस, वाऱ्याशी शर्यत लावतोस, ढगांशी खेळतोस, सारं खरं. पण ज्या धाग्याच्या जोरावर तू उंच जातोस, त्याचं टोक इथं कुणाच्या तरी हातात असतं. तू काही तुझ्या मनानं नाही उंच भराऱ्या मारू शकत. तू काही स्वतंत्र नाहीस.''

''असू दे. पण मी तुझ्यासारखा एवढ्या-तेवढ्या उडण्यानं थकत नाही ना? कसा ताकदीनं उंच उंच उडतो.''

''हे बघ पतंगदादा, मी अंगात ताकद असेल तेवढं उडतो. पण माझ्या मर्जीनं उडतो. तुझं उडणं मात्र दुसऱ्याच्या हाती आहे,'' असे म्हणून फुलपाखरू ऐटीत बागेतल्या बागेत या फुलावरून त्या फुलावर उड्या मारू लागले.

तेव्हापासून पतंगदादा फुलपाखराला बघून गप्प बसून राहतो. फुलपाखरापेक्षा आकाशात उंच भराऱ्या मारतो म्हणून फुशारकी मिरवत नाही.

**अहंकार** — गर्व. **भरारी मारणे** — उंच उडणे. **फुशारकी** — स्वतःची फाजील स्तुती, बढाई.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) पतंगाने फुलपाखराजवळ स्वतःचा मोठेपणा कसा सांगितला?
  (२) पतंगाचा गर्व केव्हा उतरला?
  (३) 'फुलपाखरू आणि पतंग' या पाठातील पतंगदादाच्या भरारीबद्दल तुम्हांस काय वाटते ते लिहा.

- **या पाठाला खालीलपैकी कोणती म्हण लागू पडते?**
  (१) गर्वाचे घर खाली (२) अंथरूण पाहून पाय पसरावे

- **वाक्यात उपयोग करा.**
  (१) फुशारकी मारणे (२) शर्यत लावणे.

- **पतंगाचे वर्णन पाच वाक्यांत लिहा.**

### व्याकरण

- **खालील विशेषणांचा वाक्यात उपयोग करा.**
  रंगीबेरंगी, नखरेबाज, उंच.

- **खालील परिच्छेदात योग्य विरामचिन्हे लिहा.**
  मी आणि तुझ्याबरोबर आकाशात नाही रे बाबा त्या फुलपाखराने आपल्या पंखांची उघडझाप करीत म्हटलं अरे पतंगदादा तू एवढा मोठा मी किती छोटा हे पंख किती चिमुकले मी आपला खालीच बरा

# १०. लपंडाव



उन्हाच्या तळ्यात
सावल्या पोहल्या
मासोळ्या बनून
सुर्रकन धावल्या

उन्हाच्या तळ्याचं
पाणी गोरेपान
दिसायला छान
पण भागेना तहान

उन्हाचं तळं हे
लांबच लांबलं
गोऱ्या सावल्यांना
खाऊन टाकलं

मग झाली गंमत
सावल्या झाल्या धिट्ट
उन्हं लागली मिटू
तळं तसं सावल्यांनी
टाकलं सारं पिऊनी

**उन्हाचे तळे** — मृगजळ.    **धिटू** — धीट.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) उन्हाचे तळे म्हणजे काय? ते कसे निर्माण होते?
  (२) उन्हाच्या तळ्यातले पाणी गोरेपान का दिसते?
  (३) सावल्या धीट झाल्या म्हणजे काय झाले?
  (४) सावल्यांनी सारे तळे कसे काय पिऊन टाकले?

- **'सुर्रकन' यासारखे तुम्हांला आठवणारे तीन शब्द लिहा आणि त्यांचा वाक्यात उपयोग करा. (जसे — फटकन : जगनच्या हातातला फुगा काटा टोचल्याने फटकन फुटला.)**

**व्याकरण**

(अ) शाळेची घंटा **वाजली.** (आ) मुले आपापल्या जागेवर **बसतात.**
(इ) आता शिक्षक **येतील.**

**या वाक्यांतील वाजली, बसतात, येतील** या शब्दांनी क्रिया कळते आणि त्या वाक्यांचा अर्थ पूर्ण होतो. अशा शब्दांना **क्रियापदे** म्हणतात.

- **खालील वाक्यांतील क्रियापदे ओळखा.**
  (१) उन्हाच्या तळ्यात सावल्या पोहल्या.
  (२) त्या पाण्याने तहान भागेना.
  (३) मला गंमत वाटली.

- **पुढील क्रियापदांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.**
  आहे, होता, असतात, नव्हती.

# ११. तेनालीरामा

(विजयनगरच्या राजाचा, कृष्णदेवरायाचा राजगुरू थट्टाचार्य आणि 'तेनालीरामा', पुढे राजगुरू व मागे 'रामा' असे प्रवेश करतात.)

*तेनालीरामा* : (विनवणीच्या स्वरात) **अहो थट्टाचार्य, अहो राजगुरू. जरा तर थांबा....** (राजगुरू थांबतो.) **तुम्ही मला ओळखलं नाहीत? मी तेनाली गावचा रामकृष्णा. तुम्ही माझ्या गावी आला होता, तेव्हा...**

*राजगुरू* : **मी कुठल्याही गावाला गेलो नव्हतो. कारण मी कुणाकडंही जात नसतो.**

*तेनालीरामा* : **मग माझं गावच तुमच्याकडं आलं असेल. गाव आलं असं नेहमीच म्हणतो आम्ही, पण आपण भेटलो होतो.**

*राजगुरू* : **शक्य नाही. भेटलो असतो तर काही खुणा राहिल्याच असत्या. मी एका सुंदर पाषाण मूर्तीला भेटलो, तेव्हा ही पहा ही डोक्यावर खोक पडली. माझ्या सासरच्या कुत्र्याला खंडोबा समजून मिठी मारली, तर माझी पोटरी त्यानं चावली. ही पहा त्या व्रणाची खूण.**

*तेनालीरामा* : **राजगुरू, तुम्ही मला भेटलात त्याची खूण तुमच्याजवळ असणं शक्यच नाही, कारण मी दगड नाही, की कुत्राही नाही. मी माणूस आहे. आपल्या भेटण्याची खूण तुमच्याजवळ नसून माझ्याजवळ आहे. तुमच्या सवयीप्रमाणे मला कडकडून भेटलात तेव्हा भस्म कपाळाला लागलं. हे पहा, ते भस्म मी जपून ठेवलंय कपाळावर.**

*राजगुरू* : **हे भस्म तेच कशावरून?**

*तेनालीरामा* : **तेच नाही हे तरी कशावरून?**

राजगुरू : रामा, तू बोलण्यात चतुर आहेस, तुला काय हवं?

तेनालीरामा : विजयनगरचे सम्राट कृष्णदेवराय यांच्या दरबारी आश्रय हवा.

राजगुरू : तो शहाणा सम्राट तुझ्यासारख्या मूर्खाला आश्रयाला ठेवणार नाही.

तेनालीरामा : क्षमा करावी राजगुरू, पण मग सम्राटांना शहाणे म्हणता येईल का?

राजगुरू : (दचकून) म्हणजे?

तेनालीरामा : मूर्खांना भोवती ठेवलं म्हणजे आपलं शहाणपण उठून दिसतं, हे जर सम्राटांना कळत नसेल तर... पण तसं कसं समजू मी?

राजगुरू : रामा, तुला बोलण्यात हरवणं कठीण आहे, पण सम्राट तुला भेटणार नाहीत.

तेनालीरामा : ते ठाऊक आहे, म्हणून तर तुमच्या मागं लागलोय, की तुम्ही भेट घडवून द्या.

राजगुरू : ते मी करणार नाही. तू राजवाड्यात माझ्याशी बोलत बोलत इतक्यात आत पोहोचलास,पण आता परत जा. इथले रक्षक आता तुला आणखी आत जाऊ देणार नाहीत. (राजगुरू तडक निघून जातात. रामा त्यांच्या मागे जाणार तोच एक रक्षक त्याला अडवतो.)

रक्षक : थांब. तू आत कसा जात होतास?

तेनालीरामा : जसा इथवर आलो तसा.

रक्षक : इथवर तरी कसा आलास?

तेनालीरामा : वाट सोड, आत जाऊ दे, म्हणजे समजेल इथवर कसा आलो ते.

रक्षक : मला तुझं बोलणं समजत नाही.

तेनालीरामा : प्रजेचं बोलणं राजाच्या अधिकाऱ्यांना समजतच नसतं, हे मला समजतं.

रक्षक : तू मला समजेल असं बोल.

तेनालीरामा : सम्राट माझ्यावर संतुष्ट आहे. त्याने राजगुरूबरोबर निरोप पाठवला होता, की मला येऊन भेट... ते पहा राजगुरू पुढे गेले..

रक्षक : हे खरं कशावरून? ह्याला पुरावा?

तेनालीरामा : ही सुवर्णमुद्रा हाच पुरावा...

रक्षक : मी समजलो नाही.

तेनालीरामा : ही सुवर्णमुद्रा घे आणि खिशात ठेव, म्हणजे सगळं समजेल.



रक्षक : अरे वंचका, सम्राटाकडून हजारो सुवर्णमुद्रा घेशील आणि माझी बोळवण फक्त एका सुवर्णमुद्रेवर करतोस?

तेनालीरामा : छे! छे! ही फक्त बोहनी. राजा हजारच काय लक्षसुद्‌धा देईल, किंवा आणखीही काही देईल.

रक्षक : मग जे काही देईल त्यातला अर्धा वाटा मला दिला पाहिजे.

तेनालीरामा : एकदम मान्य. वचन देतो.

रक्षक : मग मी निघून जातो बाहेर आणि तू जा आत; पण माझा वाटा मला दिलाच पाहिजे. विसरू नकोस.

तेनालीरामा : नाही नाही. कधीही विसरणार नाही. (पहिला रक्षक जातो. रामा पुढे जायला निघतो तोच दुसरा रक्षक आडवा येतो.)

दुसरा रक्षक : भल्या गृहस्था, तू पुढं जाऊ शकत नाहीस, कारण पहिल्या रक्षकाशी तू जे बोललास ते मी ऐकलं आहे.

तेनालीरामा : मग तर तू मला आत जाऊ दिलंच पाहिजे, कारण त्याला द्यायचं तेवढंच, तुलाही मला द्यावं लागणार हे ओघानंच आलं आहे. सम्राट मला देईल त्यातला अर्धा वाटा त्या रक्षकाचा आणि उरलेला अर्धा तुझा.

रक्षक : तसं वचन दे.

तेनालीरामा : हे घे. (हातावर हात ठेवतो.) ए, पण त्या पहिल्या रक्षकानं या माझ्या औदार्यावर खूश होऊन मला ही सुवर्णमुद्रा दिली... तू...

दुसरा रक्षक : असं? अरे, तो दरिद्री, कंगाल...

तेनालीरामा : आणि मीही तसाच, निर्धन रंकाळ... एकादशीला

**शिवरात्र भेटावी तसा योग, तरी त्यानं ही सुवर्णमुद्रा दिलीच.**

*दुसरा रक्षक* : **मी ह्या पाच देतो.** (पाच सुवर्णमुद्रा देतो. रामा घेतो.) **आणि वर तुला आत जाण्याची वाट मोकळी करून देतो.** (दोघेही हसतात. रामा व दुसरा रक्षक जातात.)

**प्रवेश दुसरा**

(कृष्णदेवराय राजाचा दरबार. अनेक दरबारी, थट्टाचार्य व रामा बसलेले आहेत. समोर एक जादूगार उभा आहे.)

*जादूगार* : **महाराज, मी आज आणखी काही आश्चर्यकारक खेळ करून दाखवणार आहे.**

*थट्टाचार्य* : **पुरे, महाराज, हे खेळ दाखवून हा जादूगार आपल्या राज्याची बदनामी करत आहे. तो सतत म्हणतो, की आहे कुणी या राज्यात माझ्या तोडीचा?**

*राजा* : **ते खरं, पण याला काय इलाज? आपल्या राज्यात या जादूगारावर मात करणारा कुणी नाही, हे दिसतंच ना?**

*तेनालीरामा* : **नाही महाराज, या जादूगारापेक्षाही अधिक उजवे ठरतील असे लोक या राज्यात आहेत.**

*राजा* : **होय? प्रधानजी अशांची नावं व पत्ते घ्या आणि त्यांना शोधून आणा, जा.**

*तेनालीरामा* : **कशाला ही दगदग करता महाराज? काखेत कळसा आणि गावाला वळसा अशीच अवस्था व्हायची.**

*राजा* : **म्हणजे या जादूगाराला हरवणारा या सभेतच उपस्थित आहे?**

*तेनालीरामा* : **होय महाराज.**

*राजा* : **कोण आहे?** (सगळी सभा व तो जादूगार सभोवार कुतूहलाने पाहतात.)

तेनालीरामा : (स्वतःकडे निर्देश करून) मीच आहे महाराज!

राजा : तू? तू या जादूगाराला हरवणार? मग हातच्या काकणाला आरसा कशाला? दाखव तुझा प्रयोग.

तेनालीरामा : होय महाराज. माझा प्रयोग तर मी डोळे बंद करून करेन; पण या जादूगाराने तो डोळे उघडे ठेवून करून दाखवावा, असं त्याला माझं आव्हान आहे.

जादूगार : आव्हान स्वीकारलं. तू डोळे मिटून प्रयोग कर, मी तो डोळे उघडे ठेवून करून दाखवतो.

तेनालीरामा : महाराज, मला साहित्य् आणण्याची परवानगी द्यावी.

राजा : तथास्तु. (रामा आत जातो.) थट्टाचार्य, रामानं या जादूगाराला हरवलं तर आपल्या राज्याची शान राहील.

तेनालीरामा : (प्रवेशून) मी तयार झालो महाराज.

राजा : या पातेल्यात हे काय आणलंस?

तेनालीरामा : काही विशेष नाही. वाळूचे मोठे मोठे खडे आहेत, लाललाल. ते मी डोळे मिटून कपाळावरून, नाकावरून, तोंडावरून सरळ घसरवतो. (तो तसे करतो.)

जादूगार : (जोरजोराने हसतो.) हा तर पोरकटपणा झाला. डोळे मिटले म्हणून काय आपलेच कपाळ, नाक, तोंड आपल्याला जाणवत नाही? डोळे मिटून जेवलो तरी घास तोंडातच जातो ना?

तेनालीरामा : हे प्रवचन कशाला? मी डोळे बंद करून हे केलं. तुम्ही तर डोळे उघडे ठेवूनही हे करू शकणार नाही.

जादूगार : (पुन्हा जोरजोराने हसतो.) महाराज, हे बालिश कृत्य आहे.

राजा : असेल, पण ते करून दाखवावं.

जादूगार : आण तुझे उरलेले वाळूचे खडे. (रामा त्याला पातेले

देतो.) **जय भोला शंकर, हे टाकले वाळूचे कंकर** (असे म्हणून तो ते वाळूचे खडे डोळे उघडे ठेवून कपाळावर ओततो, तोच त्या वाळूच्या खड्यांत मिसळलेले लाल तिखट त्याच्या उघड्या डोळ्यांत जाते आणि तो किंचाळतो. डोळे मिटतो, चोळतो. पातेले फेकून देतो.)

*तेनालीरामा* : (टाळ्या वाजवून) **हरला! जादूगार हरला.** (सगळे लोकही टाळ्या वाजवतात.)



*सर्व दरबारी* : तेनालीरामा जिंकला, तेनालीरामाचा जयजयकार असो.

*राजा* : रामा, आम्ही तुझ्यावर प्रसन्न झालोत. तुला आम्ही आमचा 'दरबारी विदूषक' नेमलं आहे. पण आज तू राज्याची शान राखलीस म्हणून काही बक्षीस माग. तू मागशील ते मिळेल.

*तेनालीरामा* : खरं बोलता? मग मला वीस फटके द्या.



*राजा* : फटके? चाबकाचे फटके? मार देऊ?

*तेनालीरामा* : होय महाराज.

*राजा* : काय वेड लागलंय काय तुला? अरे, तू एवढं मोठं राज्याचं काम केलंस आणि मी तुला वीस फटके देऊ? मला शोभणार नाही.

*तेनालीरामा* : पण हे फटके मला मिळणार नाहीत. यांतले अर्धे तुमच्या त्या पहिल्या रक्षकाला आणि उरलेले अर्धे दुसऱ्या रक्षकाला मिळतील, कारण तुमच्याकडून जे मला मिळेल त्यातलं अर्धं अर्धं वाटून देण्याचं मी त्यांना वचन दिलं आहे. तुमच्याकडून मिळणाऱ्या प्राप्तीतला अर्धा वाटा मिळाल्याशिवाय ते मला आत सोडायला तयारच नव्हते.

*राजा* : (रागावून) म्हणजे माझे रक्षक लाच घेतात! रामा, तू फार चतुर आहेस. आज तू देशाचं दुसरं मोठं काम केलंस. राज्यात बळावलेली लाचलुचपत माझ्या नजरेला आणलीस. प्रधानजी, त्या रक्षकांना फटके मारा आणि कामावरून काढून टाका.



**व्रण** — खूण. **वंचक** — धूर्त, लबाड. **रंक** — दरिद्री.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) तेनालीरामाने राजगुरूला आपली ओळख कशी करून दिली?
  (२) राजगुरूला तेनालीरामाचा कोणता गुण व तो कसा दिसून आला?
  (३) तेनालीरामाने जादूगाराचा कसा पराजय केला?

- **या पाठात आलेल्या म्हणी व त्यांचे अर्थ लिहा.**

- **असे कोण कोणास म्हणाले? ते लिहा.**

(१) "हे पहा, ते भस्म मी जपून ठेवलंय कपाळावर."

(२) "तो शहाणा सम्राट तुझ्यासारख्या मूर्खाला आश्रयाला ठेवणार नाही."

(३) "थांब, तू आत कसा जात होतास?"

(४) "तू डोळे मिटून प्रयोग कर, मी तो डोळे उघडे ठेवून करून दाखवतो."

(५) "फटके? चाबकाचे फटके? मार देऊ?"

- **अर्थ सांगून वाक्यात उपयोग करा.**

(१) संतुष्ट असणे. (२) वचन देणे.

(३) उजवा ठरणे. (४) प्रसन्न होणे.

- **पाठातील तीन प्रश्नार्थक वाक्ये लिहा.**

- **या पाठातील जी वाक्ये वाचून तुम्हांला हसू आले, अशी तीन वाक्ये लिहा.**

**व्याकरण**

- **पुढील वाक्यांतील सर्वनामे व क्रियापदे ओळखा.**

(अ) ते देशाचे भक्त होते.

(आ) रामजीने त्याला ओळखले.

(इ) मी खेळायला जाईन.

(ई) जो प्रेमळ असतो तो सर्वांना आवडतो.

(उ) तिकडे कोण पळाला?

(ऊ) तुला आईने काय दिले?

(ए) आपण सहलीला जाऊया.

(ऐ) त्याला गोष्ट माहीत नव्हती.

# १२. सौर ऊर्जा

भगवंतरावांना सरपंचांकडे दुपारी जेवायला जायचे होते. ते आणि त्यांच्या पत्नी बारा वाजण्याच्या सुमारास सरपंचांकडे पोहोचले. सरपंचांनी भगवंतरावांचे स्वागत केले. बैठकीतल्या दिवाणावर भगवंतराव बसले आणि त्यांच्या पत्नी आत गेल्या. भगवंतराव आणि सरपंच गावातील काही समस्यांबाबत बराच वेळ बोलत होते. एक वाजण्याच्या सुमारास सरपंच घरात गेले. भगवंतरावांच्या पत्नी तेवढ्यात बैठकीत आल्या आणि भगवंतरावांना हळूच म्हणाल्या,

''काय हो, भोजनालाच बोलावलं होतं नं आपल्याला? आणि आजच नं? की...?''

''म्हणजे काय? मी भलती चूक कशी करीन?''

''अहो, पण स्वयंपाकघरात काही हालचाल दिसत नाही. गॅसची चूल थंड दिसते मला आल्यापासून.''

भगवंतराव जरा गडबडलेच. पण तेवढ्यात सरपंच आले. म्हणाले, ''चला आता जेवायला.''

भगवंतराव आणि त्यांच्या पत्नी साशंक मनाने आत गेले. स्वयंपाक दिसत नाही आणि जेवायला तर आत आणले! ''काही द्रौपदीची थाळीबिळी मिळालीय की काय सरपंचाना?'' असे भगवंतराव हळूच पत्नीला म्हणाले. तेवढ्यात सरपंचांच्या पत्नी आणि पाठोपाठ त्यांच्या मुली जिन्यातून उतरताना दिसल्या. प्रत्येकीच्या हाती कसले तरी डबे होते. ते डबे उघडताच त्यांत वरण, भात वगैरे शिजवलेले अन्न दिसले.

''स्वयंपाक गच्चीवर केला की काय?'' भगवंतरावांनी सहज विचारले.

सरपंच म्हणाले, ''होय, सूर्यचुलीच्या साहाय्यानं शिजवलंय हे

अन्न. आपल्या गावासाठी शंभर सूर्यचुली मागवल्यात मी.''

''आम्हांलाही द्या की अशा सूर्यचुली,'' भगवंतरावांनी मागणी केली आणि म्हणाले, ''पण खरंच हो, सूर्याची कितीतरी उष्णता आपण वाया घालवतो!''

''होय ना!'' — सरपंचांनी पुष्टी भरली आणि म्हणाले, ''अहो, वर्षातले जवळजवळ दहा महिने आपल्याकडे ऊन तापत असतं. आपण फारतर धान्य, मिरच्या, कपडे, मासे वाळवायला उन्हाचा वापर करतो...



''लहान मुलं भिंग घेऊन त्यातून उन्हाची किरणं कागदावर पाडतात आणि आगपेटीची काडी न पेटवताच कागद जाळण्याची जादू करून दाखवतात. खरंतर सूर्यापासून मिळणारी प्रचंड उष्णता आपण वाया घालवतो. पण ही वाया जाणारी उष्णता साठवून एक शक्ती निर्माण करता येते. सूर्याच्या या शक्तीला सौर ऊर्जा म्हणतात.

''या सौर ऊर्जेच्या जोरावर अनेक गावांतून आजकाल रस्त्यावरचे दिवे, रेडिओ, टी.व्ही. चालवले जातात. मोटारी आणि स्कूटर्सदेखील सौर ऊर्जेवर चालवण्याचे प्रयोग सफल होत आहेत. क्रूड ऑईल आणि पेट्रोलसाठी खूप किंमत द्यावी लागते. शिवाय ते भरपूर प्रमाणात मिळेल ह्याचा भरवसा नसतो. त्यांचे साठे संपण्याचीही भीती आहेच. सूर्यापासून मिळवलेल्या ऊर्जेचं मात्र तसं नाही. ती विपुल प्रमाणात मिळते आणि त्यासाठी पैसेही मोजावे लागत नाहीत.

''कोळसा, खनिज तेल इत्यादी ऊर्जा देणाऱ्या वस्तूंमुळे वातावरण आणि पाणी प्रदूषित होते. पण सौर ऊर्जेमुळे असा कुठलाही धोका नाही.''

हे सगळे ऐकून भगवंतराव सूर्यदेवापुढे नम्र झाले आणि म्हणाले, ''हे सूर्यदेवा, तुझी शक्ती अपार आहे. ती मिळवायला 'धीयो यो नः प्रच्योदयात्'-आम्हांला बुद्धी दे 'तेजस्विनावधीतमस्तु'-आमची बुद्धी प्रखर कर.''



स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.

  (१) ''काय हो, भोजनालाच बोलावलं होतं नं आपल्याला?
  असा प्रश्न भगवंतरावांच्या पत्नीने का विचारला?

  (२) भगवंतराव का गडबडले?

  (३) पाहुण्यांसाठी केलेल्या स्वयंपाकात कोणते नावीन्य होते?

(४) हल्ली सौर ऊर्जेचा उपयोग कोणकोणती कामे करण्यासाठी करतात?

- **रिकाम्या जागा भरा.**

(अ) कोळसा, खनिज तेल या ऊर्जा देणाऱ्या वस्तूंमुळे .................. आणि .................. प्रदूषित होते.

(आ) सूर्यापासून मिळवलेली ऊर्जा .................. प्रमाणात मिळते आणि त्यासाठी .................. मोजावे लागत नाहीत.

(इ) सूर्याच्या शक्तीला .................. म्हणतात.

- **शब्दसमूहाबद्दल एक शब्द द्या.**

(१) खेडेगावचा कारभार पाहणारा.

(२) दुपारी बारा वाजण्याची वेळ.

(३) सूर्याच्या उष्णतेवर वापरण्यात येणारी चूल.

- **असे कोण कोणास म्हणाले?**

(१) ''चला आता जेवायला.''

(२) ''स्वयंपाक गच्चीवर केला की काय?''

(३) ''अहो, पण स्वयंपाकघरात काही हालचाल दिसत नाही.''

- **अन्न शिजवण्यासाठी कोणकोणत्या प्रकारचे इंधन वापरतात?**

व्याकरण

- **पाठातील प्रत्येकी दोन नामे, सर्वनामे, विशेषणे आणि क्रियापदे लिहा.**

# १३. धरत्रीले दंडवत



काया काया शेतामंधी
घाम जिरव जिरव
तेव्हा उगल उगल
कायामधून हिरवं ।
येतो पीकाले बहार
शेताशेतात हिर्वय
कसं पिकलं रे सोनं
हिर्व्यामधून पिवयं ।
अशी धरत्रीची माया
अरे, तीले नही सीमा
दुनियाचे सर्वे पोटं
तिच्यामधी झाले जमा ।
शेतामंधी भाऊराया
आला पीक गोंजारत
हात जोडीसन केला
धरत्रीले दंडवत ।



शेतामंधी भाऊराया
खाले वाकला वाकला
त्यानं आपल्या कपायी
टिया माटीचा लावला ।
अशी भाग्यवंत माय
भाऊरायाची जमीन
वाडवडीलाचं देवा,
राखी ठेव रे वतन ।



**धरत्री** — जमीन. **दंडवत** — नमस्कार. **टिया** — टिळा. **वतन** — जमीन-जुमला.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) काळ्या शेतामधून हिरवे पीक केव्हा उगवेल?
  (२) धरतीच्या मायेचे मोठेपण कशात आहे?
  (३) भाग्यवंत माय कोण?

- **पुढील शब्दांत 'य' हा वर्ण जिथे जिथे दुसऱ्या कोणत्या वर्णासाठी आला असेल तिथे तिथे तो दुसरा वर्ण लिहा.**
  काया, टिया, पिवयं, भाऊराया, कपायी, माय.

- **खालील अर्थाच्या कवितेच्या ओळी लिहा.**
  (१) भाऊरायाने शेतात खाली वाकून जमिनीची माती आपल्या कपाळाला लावून घेतली.
  (२) पृथ्वीच्या मायेला मर्यादाच नाही, तिच्या पोटात सारे जग सामावून जाऊ शकते.
  (३) पिकाला हाताने कुरवाळीत कुरवाळीत येऊन भाऊरायाने दोन्ही हातांनी धरित्रीला दंडवत घातला.





# १४. देवी अहिल्याबाई होळकर

सुमारे अडीचशे वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्या वेळी माळवा प्रांतात होळकरांचे राज्य होते. माळव्यातील काही भिल्ल लोक चोऱ्या करत, डाके घालत, वाटसरूंना लुटत. त्यांच्या भयाने जनता त्रस्त झालेली होती.

त्या वेळी होळकरांचा राज्यकारभार एक विधवा स्त्री पाहत होती. तिने त्या भिल्लांना प्रेमाने समजावून पाहिले. पण हा तिचा दुबळेपणा आहे, असे समजून त्यांनी उपद्रव देण्याचे प्रमाण वाढवले. मग तिने सैन्य पाठवले आणि त्या भिल्लांच्या प्रमुखांना अटक करून जबर शिक्षा केली. पण त्याच वेळी त्या स्त्रीने इतर भिल्लांना शेती व कामधंदे करायला लावले. सर्व ती मदत दिली. भिल्लांचे जीवन सरळ आणि सुखकारक झाले. जनतेला होणारा त्यांचा उपद्रव कायमचा नाहीसा झाला. ते भिल्ल आता त्या स्त्रीला आई मानू लागले.

ही त्यांची आई म्हणजेच देवी अहिल्याबाई होळकर. प्रेम आणि बळ या दोन्ही साधनांचा योग्य वापर करून अहिल्याबाईंनी होळकरांचे राज्य सुरक्षित केले. लोक सुखी झाले. भिल्लांप्रमाणेच तेही अहिल्यादेवींना आई मानू लागले. त्या लोकमाता झाल्या.

अहिल्यादेवी चौंडी गावच्या माणकोजी शिंदे यांची कन्या आणि मराठ्यांचे राज्य उत्तरेकडे स्थापन करणाऱ्या शूर वीर मल्हारराव होळकरांची सून. शिंदे घराणे धार्मिक प्रवृत्तीचे होते. त्यामुळे धर्माचे बाळकडू तिला घरातूनच मिळाले. अहिल्यादेवींनी ईश्वराची भक्ती आणि धर्मकृत्यांचे आचरण आमरण केले.

अहिल्यादेवींनी भारतभर अनेक देवळे बांधली. तसेच मशिदीही उभारल्या. साधुसंतांबरोबरच मुल्लामौलवींनाही दान दिले. त्यांची ही धार्मिक उदारता पाहून हैद्राबादच्या निजामाच्या राज्यातील अनेक मुसलमान अहिल्यादेवींच्या आश्रयाला येऊन राहिले.

अहिल्यादेवींनी संपूर्ण भारतात देवळांबरोबरच धर्मशाळा बांधल्या, विहिरी खोदल्या, घनदाट जंगलातून जाणारे अनेक रस्ते तयार केले, तलाव बांधले आणि भुकेल्यांना सतत अन्नदान होत राहील अशी कायम स्वरूपाची व्यवस्था केली. या सोयी सर्व धर्मांसाठी आणि जातीपातींसाठी खुल्या होत्या. मानवता हाच खरा धर्म आहे असे त्या मानत असत. अहिल्यादेवी धार्मिक असल्या तरी रूढी आणि परंपरांचा त्यांनी आंधळेपणाने स्वीकार केला नाही.

पती वारल्यानंतर त्या सती गेल्या नाहीत. कारण म्हातारे सासरे आणि निराधार राज्य यांचे रक्षण करणे रूढीपेक्षा अधिक मोलाचे आहे हे त्यांना पटले होते. जनतेची आर्थिक परिस्थिती सुधारावी म्हणून त्यांनी उद्योगधंद्यांच्या विकासाला प्राधान्य दिले. वस्त्रोद्योग खूप भरभराटीला आणला. विणकर, कारागीर, मजूर, कलावंत, साहित्यिक आणि गुणीजन यांना त्यांच्या विकासासाठी पैसा, घर व

इतर सुखसोयी त्यांनी उपलब्ध करून दिल्या.

राजनीतीचे आणि युद्धाचे यशस्वी डावपेच अहिल्यादेवी आपल्या सासऱ्यांकडून, राजे मल्हारराव होळकरांकडून शिकल्या. मल्हारराव आधी शेळ्या-मेंढ्यांचे पालन करत. पण बुद्धिमत्ता, साहस आणि शौर्य गाजवून ते राजे झाले.

अहिल्यादेवी स्वत: रणांगणात लढत. त्यांनी स्त्रियांचीदेखील सेना उभारली होती. त्याबरोबरच चातुर्य आणि निष्कपट मैत्री यांचाही त्या वापर करत. एकदा राघोबादादा पेशवे, होळकरांवर स्वारी करायला आले. अहिल्यादेवींनी युद्धाची जय्यत तयारी केली. राघोबादादांना पत्र लिहिले, की 'मी स्त्री — या लढाईत हरले, तर माझे हसे होणार नाही, पण तुम्ही हरलात तर तुम्हांला तुमचे काळे तोंड लपवायला जागा उरणार नाही.' या पत्राचा राघोबादादांवर इष्ट परिणाम झाला. त्यांनी मैत्रीचा हात पुढे केला. होळकरांविरुद्ध पुन्हा-पुन्हा उठाव करणाऱ्या राजपुतांशी अहिल्यादेवींनी युद्ध केले आणि ते जिंकून त्यांना आपले मित्र केले. पेशवाईतील चतुर कारभारी, नाना फडणीस यांनी अहिल्यादेवींच्या या विजयाबद्दल पुण्यात त्यांचा सन्मान केला. तोफांची सलामी दिली आणि म्हटले, ''आजवर आम्ही समजत होतो, की अहिल्याबाई केवळ पूजापाठ व धर्मकर्मच करत बसतात. पण आज त्यांचे युद्धातील शौर्यही आम्ही पाहिले. मराठेशाहीला त्यांचा अभिमान वाटतो.''

अहिल्यादेवी राणी असल्या तरी त्यांची राहणी साधी असे. प्रजेच्या सुखदु:खांत त्या सदैव सहभागी होत. प्रजेला त्रास देणाऱ्या कोणत्याही अधिकाऱ्याची त्यांनी कधी गय केली नाही. होळकरांच्या राज्याचे आधारस्तंभ म्हणजे तुकोजी होळकर. त्यांचा मल्हारी नावाचा मुलगा प्रजेला छळत असे. अहिल्यादेवींनी त्याला पकडून आणले आणि कैदेत टाकले.

अहिल्यादेवींनी ग्रामपंचायती सुरू केल्या. पंचायतींना द्रव्य आणि अधिकार दिले. ग्रामीण जीवन सुखी करणाऱ्या पंचायती राज्यसंस्थेला त्या काळी खूप नावलौकिक मिळाला.

शेती व शेतकरी यांच्या विकासाकडे अहिल्यादेवींनी लक्ष दिले. शेतकऱ्यांना सर्व प्रकारची मदत व सोयीसवलती दिल्या.

माणसाप्रमाणेच पशू आणि पक्षी यांच्यावरही त्या दया व प्रेम करत. पशुपक्ष्यांसाठी मोकळे रान राखून ठेवलेले असे. त्यात त्यांना पाणी व खाद्य भरपूर मिळेल अशी सोय केलेली असे.

अहिल्यादेवींची विमल कीर्ती परदेशातही पसरली होती. परदेशातील इतिहासकार, शासनकर्ते आणि कवी यांनी अहिल्यादेवींची खूप स्तुती केली. स्कॉटलंडची 'जोनावेली' नावाची त्या काळची एक सुप्रसिद्ध कवयित्री लिहिते —

"ते राज्य शांतीचे तीस वर्षे नांदले ।
मुक्तपणे सर्वांनी यशोगान गाइले ॥"



**बाळकडू** — लहानपणी मिळालेले वळण. **उपद्रव** — त्रास. **विमल** — निष्कलंक.



## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  (१) काही भिल्लांचे जीवन सुखकारक का झाले?

  (२) राघोबादादांनी मैत्रीचा हात पुढे करण्याचे कारण काय?

- **अहिल्यादेवींनी राघोबादादांना लिहिलेल्या पत्राचा मजकूर तुमच्या शब्दांत लिहा.**

- **अहिल्यादेवींनी केलेल्या सुधारणांची माहिती द्या.**

- **वाक्यात उपयोग करा.**

  गय करणे, काळे तोंड लपवणे, बाळकडू.

- **विरुद्ध अर्थी शब्द लिहा.**

  उपद्रवी, सुरक्षित, यशस्वी, इष्ट, सोय.

### व्याकरण

मराठी भाषेत तीन लिंगे आहेत : **पुल्लिंग , स्त्रीलिंग, नपुसकलिंग**

**पुल्लिंग** — राजा, हत्ती, गरुड, लाडू, हर्ष.

**स्त्रीलिंग** — वाणी, गाय, चिमणी, जिलेबी, भक्ती.

**नपुसकलिंग** — राज्य, घुबड, पुरण, पुस्तक, वासरू.

- **खालील नामांचे लिंग ओळखा.**

  वाटसरू, भिल्ल, कन्या, धर्मशाळा, झाड.

- **एखाद्याचे बोलणे अवतरणात लिहितात. त्यासाठी " .............. " अशी खूण करतात.**

  या पाठात अवतरणांत आलेली वाक्ये लिहून दाखवा.

# १५. दीपत्कार



परसातील कुंड्यांत सकाळी
दिवे लावले कुणी?
बिनवातीचे बिनतूपाचे
निरांजनावाचुनी?

उजाडल्यावर घराघरांतील
मालवले ना दिवे?
अंगणात बाहेर मग अता
दिवे कशाला हवे?

या सूर्याच्या उजेडातही
उजेड यांचा पडे!
नवल खरोखर की विझती ना
वाऱ्यांच्या झापडे!

कुंड्यांतुनही दिव्यादिव्यांची
कशी मौज थाटते !
या आरतीने ओवाळावे —
देवाला, वाटते.

मज न कळे ही कशी दिव्यांची
जादू घडली असे?
परसातील कुंड्यांत सकाळी
दिवे लागले कसे?

कुणि सूर्य-परी करून गेली
दिवेलागणी जणू !
तर या दीपत्काराला मी
शुभं करोति म्हणू?

**दीपत्कार** — प्रकाश देणारा. **कुंडीतील दिवे** — कुंडीतील झाडांना आलेली फुले. **झापडे** — झोत.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) उजाडल्यावर अंगणातील कुंड्यांमध्ये दिवे लागले आहेत, असे कवी का म्हणतो?
  (२) घरातील दिवे व कुंड्यांतील दिवे यांत कवीला कोणता फरक जाणवतो?
  (३) कुंड्यांतील दिवे पाहून कवीला काय वाटते?
  (४) ही दिवेलागणी पाहून कवीला कोणता प्रश्न पडला आहे?

- **खालील शब्दाला समानार्थी शब्द लिहा.**

दिवा, घर, सूर्य, उजेड, नवल.

व्याकरण

- **या पाठातील पुल्लिंगी, स्त्रीलिंगी आणि नपुसकलिंगी नामे शोधून लिहा.**

# १६. उजेड पडला

या माझ्या बालपणीच्या आठवणी आहेत.

पाचवीच्या शिक्षणासाठी मी बेळगावला जाऊ लागलो. बेळगाव आमच्या गावापासून सहा-सात किलोमीटर दूर होतं. मी बेळगावला जाणार म्हणून आईनं माझ्या डोक्याला व पायाला भरपूर खोबऱ्याचं तेल लावलं. बेळगावला जाईपर्यंत डोक्यातलं तेल झिरपून कानांच्या बाजूनं गालावर येत होतं. पायाला लावलेल्या तेलानं रस्त्याच्या लाल धुळीला सामावून घेतलं होतं.

बाबा मला शाळेत सोडायला बरोबर आला. तेथील मुलांनी पांढरा शर्ट व खाकी चड्डी घातली होती. माझा सदरा हिरव्या रंगाचा होता. तो एवढा ढगळ होता, की चड्डीचंही काम तोच करायचा. पण आज मी पट्ट्यापट्ट्यांच्या कापडाची चड्डी घातली होती. त्यामुळं मी सर्वांपेक्षा वेगळा प्राणी दिसत होतो.

मोठा वर्ग पाहून मी भांबावून गेलो. वर्गात बसण्यास बाकडी आहेत हे मी पहिल्यांदाच पाहत होतो. गावाकडे अशी बाकडी नव्हती म्हणून मी बसण्यासाठी बरोबर गोणपाट घेऊन गेलो होतो. मला वाटलं, बाकं फक्त कुळवाड्यातील मुलांना बसण्यासाठीच असतील म्हणून मी गोणपाट अंथरून जमिनीवर ठिया मांडला. सगळीजणं माझ्याकडं तो प्रकार बघून हसू लागली. मला काहीच कळेना. एका विद्यार्थ्यांनं मला "बाकड्यावर येऊन बैस" म्हणून सांगितलं. पण मास्तर आल्यावर, मी बाकावर बसलेलं पाहून मारतील या भीतीनं तिथंच बसून राहिलो. एवढ्यात मास्तर आले. माझ्याकडं पाहून ओरडले — "बाकड्यावर येऊन बैस!" मास्तर असं कसं सांगत आहेत? माझं काही चुकलं का, असं समजून मी घाबरून उभा राहिलो. बाकावर जाऊन बसायला मला धाडसच होईना! ते पुन्हा ओरडले, तेव्हा मी भीत भीत बाकावर

अवघडून बसलो. सगळी मुलं माझ्याकडं टकमक बघत होती. हसत होती.

वर्गातील मुलांचे 'इनशर्ट' पाहून मधल्या सुट्टीत मीही इनशर्ट केला. माझा सदरा चड्डीत कोंबला. कमरेला असलेला करदोरा त्यावर घातला. सदरा लांबच लांब असल्यामुळे तो चड्डीच्या आतून आरपार होऊन खाली डोकावू लागला. तशा थाटातच मी ऐटीत चालू लागलो. माझा तो अवतार पाहून पुन्हा सर्वजण खदखदून हसू लागले. माझं कुठं चुकलं हे मला कळेना. मला वाटलं, 'अधूनमधून हसणं ही शहरातील लोकांची सवयच असावी.'

बेळगावला पाऊस भयंकर! सोसाट्याचा वारा. बाबानं मला त्यांच्या साहेबांच्या मुलाचा जुना रेनकोट आणून दिला होता. तो अंगात



घालून मी रूबाबात शाळेला जात असे. तो रेनकोट फारच जुना झालेला होता. त्यामुळं गावाहून शाळेस जाईपर्यंत तासाभरात रेनकोटामधून पाणी झिरपून मी भिजून चिंब होत असे. भिजल्यामुळं तसाच वर्गात कुडकुडत बसत असे.

शहरी वातावरणामुळं मी थोडा-थोडा धीट बनत चाललो होतो. कपड्यांचा गबाळेपणा सोडावा म्हणून बाबाला सांगून मी पांढऱ्या शर्टासाठी व खाकी चड्डीसाठी कापड आणायला लावलं. बेळगावातील शिंप्याकडं कपडे शिवायला टाकले. त्यानं अंगाचं माप घेतलं. गावातला शिंपी मला दुरूनच पाहून कपडे शिवत असायचा.

नोव्हेंबर महिन्यामध्ये एक घटना घडली. अनगोळ येथे एका कार्यकर्त्यानं मागासलेल्या जातींतील विद्यार्थ्यांसाठी एक वसतिगृह सुरू केलं. परंतु त्याला पुरेसे विद्यार्थी मिळत नव्हते. तो चौकशी करत करत आमच्या गावात आला आणि वसतिगृहात विद्यार्थी मिळवण्यासाठी गावातील मास्तरांना भेटला. मास्तर व तो दोघेजण आमच्या घरी आले. मला वसतिगृहात दाखल करण्यासाठी बाबाला समजावू लागले. तेव्हा बाबा त्यांना म्हणाला —

''बोरडिंगमध्ये ठेवूस माझं पोर काय बेवरशी हाय? त्याचं शिकश्यान करायला मी घट्ट हाय मास्तर! तसली गोष्ट सांगू नका माझ्या म्होरं!''

परंतु त्या कार्यकर्त्यानं आपली चिकाटी काही सोडली नाही. तो सारखा येऊन घरात बसू लागला. तेव्हा बाबा आणि इतर दोन मुलांचे पालक त्या गोष्टीला तयार झाले. वसतिगृह म्हणजे काय हे आम्हांला समजत नव्हतं. तो कार्यकर्ता सांगत होता — ''तेथेच रहायचं, जेवण करायचं, तेथेच शिकायचं. महिन्यातून एकदा आपल्या घरी जाऊन यायचं.''

गावाकडून बेळगावाकडं हेलपाटे तरी वाचतील म्हणून आम्ही तिघांनी

वसतिगृहात जाण्याचा विचार केला. तो कार्यकर्ता आम्हां तिघांना घेऊन गेला. आमच्या अगोदरच तेथे पंधरा-सोळा मुलं दाखल झाली होती. त्या रात्री आम्ही सर्वांनी एकत्र बसून जेवणं केली. सर्वजण एकत्रच झोपलो. त्या कार्यकर्त्याला सर्वजण गुरुजी म्हणत होते.

त्या वेळी खेड्यापाड्यात वीज आलेली नव्हती. घराघरांतून घासलेटच्या चिमण्या वापरत. आमच्या खोलीत एक विजेचा दिवा होता. हा एवढा छोटा दिवा इतका प्रकाश कसा काय देतो याचं आम्हांला विशेष कुतूहल वाटायचं. तो दिवा गुरुजीच पेटवत असत आणि तेच बंद करत असत. आम्ही सर्वजण खेड्यांतून आलेलो होतो. तेव्हा तो दिवा पाहून आम्हां सर्वांनाच आश्चर्य वाटायचं. तो दिवा असा का टांगलेला असावा? चिमणी सरळ ठेवतात आणि हा उलटा कसा काय? चुकून कोणाच्या तरी घरी लाटण असायचं. ते लाटण या दिव्यापेक्षा मोठं असून या दिव्याचा त्यापेक्षा कितीतरी जास्त प्रकाश? या दिव्याला तेल कोठून घालत असतील? असे अनेक प्रश्न आमच्या मनात निर्माण होत असत. त्या वेळी आम्ही सर्व खेड्यातील पोरं. खेड्यात विजेचे दिवे कोठून पाहणार! प्रत्येकाच्या घरात चिमणी, लाटण, नाहीतर तेलाची पणती. एवढ्याच मिणमिणत्या उजेडाची सवय. फुंकर घातली किंवा फू म्हटलं तर दिवा विझून जायचा.एका रात्री तो दिवा लावून गुरुजी कोठेतरी बाहेर गेले. आम्ही सर्वजण अभ्यास करत होतो. बराच वेळ अभ्यास केल्यानंतर आम्ही झोपण्याच्या तयारीला लागलो. दिवा जळतच होता. गुरुजी आल्याशिवाय दिवा विझवणार कोण? आणि दिवा तसाच ठेवून आम्ही झोपी गेलो तर रात्रभर दिवा जळणार आणि त्यातील तेलही संपणार. गुरुजी आले तर तो दिवा का विझवला नाही असे विचारणार. तेव्हा दिवा विझवावा का विझवू नये याबद्दल आमच्यांत वाद सुरू झाला आणि शेवटी तो विझवण्याचा निर्णय आम्ही एकमतानं घेतला.



पण दिवा विझवायचा कसा?

एक उंच मुलगा उठला आणि त्यानं टाचा उंच करून दिव्याला फुंकर मारली. पण दिवा विझला नाही. मग दुसरा एक उंच मुलगा ऐटीत उठून त्यानं जोरात फुंकर मारली पण दिवा विझला नाही. तेव्हा दिवा 'लई पावरबाज हाय' असा निष्कर्ष काढून एकदम चौघांनी फुंकण्याचा प्रयत्न केला, तरीही काही उपयोग झाला नाही. 'आता काय करावं?' या विचारात आम्ही पडलो आणि दिवा विझवण्याचा पुन्हा प्रयत्न करू लागलो.

अखेर एक उपाय सापडला! हातानं वारा घालून घरात चिमणी विझवतात तसं करूया असं आम्ही ठरवलं. आम्हां सर्वांमध्ये गलतग्याचा उप्पार फारच खट्याळ होता. तो मोठ्या दिमाखानं उठला आणि दिव्याजवळ गेला. त्यानं हात उंच करून दिव्यावर जोरानं फटका मारला.'फट्ट' असा आवाज झाला आणि सर्वत्र अंधार झाला. दिवा विझवल्याच्या खुशीत उप्पार अंधारातच गर्वानं म्हणाला, ''बघितलात! मी कसा दिवा विझवला!''

आम्ही सगळेजण त्याचं कौतुक करत अंधारात झोपी गेलो.

गुरुजी सकाळी लवकरच वसतिगृहाकडे आले. त्या वेळी आम्ही सर्वजण झोपेतच होतो. गुरुजींनी छडी घेऊन आळीपाळीनं सर्वांना प्रसाद देत उठवलं. मुलंही खडबडून जागी झाली. गुरुजी दिव्याकडे पाहून मोठ्यानं ओरडले, ''येथील दिवा कोणी फोडला रे?''

आम्ही सभोवार पाहिलं. भिंतीकडंला त्या दिव्याच्या काचा पडलेल्या दिसल्या. पूर्वीच्या जागेवर त्या दिव्याचा पत्ताच नव्हता. आम्ही सर्वजण एकमेकांकडं पाहू लागलो. आता गुरुजी सर्वांनाच मारणार म्हणून एकानं उप्पारचं नाव सांगितलं. तसा उप्पार उठून उभा राहिला. तो थोडा धीटही होता. ''गुरुजी मी दिवा फोडला नाय! विझवला आहे. मी कशाला दिवा फोडू?'' आणि सर्वांकडं पाहून पुन्हा म्हणाला — ''व्हय की न्हाय रं?''

एकजण धैर्यानं म्हणाला, ''व्हय, व्हय, गुरुजी रात्री त्येनंच दिवा विझवलाय!''

''तो कसा रे?''

''सगळ्यांनी फुकलं तरी दिवा विझंना. म्हणून मी हातानं वारा घालून दिवा विझवला.'' उप्पारचं बोलणं ऐकून गुरुजी पोट धरून हसू लागले. ते हसताहेत हे पाहून आम्ही एकमेकांकडं पाहू लागलो. त्यानंतर गुरुजींनी आम्हांला त्या दिव्याच्या बटणाकडं नेलं, आणि दिवा लावायचा असल्यास बटण खाली ओढायचं व बंद करायचा असल्यास ते वर करायचं असं समजावून सांगितलं. आमच्याकडं पाहून म्हणाले, ''पुन्हा तुम्ही त्या दिव्याकडं गेलात आणि तसं काही केलंत, तर विजेचा शॉक लागून फुकट मराल.'' तेव्हा कुठं आम्हांला त्या विजेच्या दिव्याचं गांभीर्य समजलं.



**ढगळ** — ढिला. **भांबावून जाणे** — गोंधळणे. **कुळवाडी** — सधन कुणबी. **ठिया मांडणे** — ठाण मांडून बसणे. **लाटण** — कंदील.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात प्रश्नांची उत्तरे लिहा.**

  (१) मी सर्वांपेक्षा 'वेगळा प्राणी' दिसत होतो असे लेखक का म्हणाला?

  (२) लेखक बाकावर का बसला नाही?

  (३) मुलांना विजेच्या दिव्याची माहिती कशी व केव्हा कळली?

  (४) 'उजेड पडला' या शीर्षकातून काय सुचवायचे आहे?

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**

  (१) गोणपाट, (२) बेवारशी, (३) कुतूहल, (४) पावरबाज.

- **खालील गोष्टींची कारणे लिहा.**

  (१) शाळेत गोणपाट नेले.

  (२) मधल्या सुट्टीत इनशर्ट केला.

  (३) दिव्यावर जोराचा फटका मारला.

- **खालील शब्दांचा वापर करून म्हणी तयार करा.**

  **जसे : दिवा — अंधार — दिव्याखाली अंधार.**

  (१) आड - विहीर, (२) रात्र - सोंगे, (३) अंधळा - डोळे, (४) मोर-लांडोर.



# १७. संतवाणी

(१)

ऊस डोंगा परी रस नोहे डोंगा ।
काय भुललासी वरलिया रंगा ॥
नदी डोंगी परी जळ नोहे डोंगे ।
काय भुललासी वरलिया रंगे ॥
चोखा डोंगा परी भाव नोहे डोंगा ।
काय भुललासी वरलिया रंगा ॥

— संत चोखामेळा

(२)

ऐसे केले या गोपाळे । नाही सोवळे ओवळे ॥
काटे केतकीच्या झाडा । आत जन्मला केवडा ॥
फणसाअंगी काटे । आत अमृताचे साठे ॥
नारळ वरुता कठिण । परि अंतरी जीवन ॥
शेख महंमद अविंध । त्याचे हृदयी गोविंद ॥

— संत शेख महंमद



**डोंगा** — वाकडा. **जळ** — पाणी. **वरलिया** — वरवरचा. **अंतरी** — अंतःकरणात. **अविंध** — मुसलमान.

## स्वाध्याय

- **वरवरच्या रूपावर भाळू नये हे पटवणाऱ्या चोखामेळा यांच्या अभंगातील ओळी लिहा.**

- **शेख महंमदाचा उपदेश त्यांनी दिलेल्या उदाहरणांसहित लिहा.**

- **खालील ओळींचा अर्थ लिहा.**

  (१) नारळ वरुता कठिण । परि अंतरी जीवन ॥
  
  (२) शेख महंमद अविंध । त्याचे हृदयी गोविंद ॥

- **वळणदार अक्षरांत लिहा.**

  'काय भुललासी वरलिया रंगा'

व्याकरण



नामावरून वस्तू एक आहे की अनेक आहेत ते कळते, त्याला **वचन** असे म्हणतात.

एका वस्तूचा बोध झाला तर ते **एकवचन.**
उदा. फूल, खुर्ची, रुपया, भाऊ, घर, रस्ता.

अनेक वस्तूंचा बोध झाला तर ते **अनेकवचन.**
उदा. फुले, खुर्च्या, रुपये, भाऊ, घरे, रस्ते.

काही नामांची एकवचनी व अनेकवचनी रूपे **सारखीच** असतात.
उदा. वाघ, दिशा, देश, खेळ, कागद.

**काही नामे फक्त एकवचनीच** असतात.
उदा. पाणी, दही, मीठ, सोने, आकाश, कापूस, बाजरी.



# १८. सिंधुदुर्ग

सुमारे सव्वातीनशे वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्या वेळी मालवण बंदरावरचे कोळी अगदी गडबडून गेले होते. प्रत्यक्ष शिवाजीराजे त्यांच्याकडे आले होते. ते त्यांना मालवण बंदराची आणि बंदराजवळच्या बेटांची माहिती विचारत होते. या बंदराजवळ कुरटे नावाचे बेट आहे. तिथवर जायचे अंतर बंदरापासून फारतर एक-दीड किलोमीटर असेल, पण वाटेतले खडक चुकवणे हे साध्या नावाड्याचे काम नव्हते.

मालवणच्या कोळ्यांना मात्र तिथल्या समुद्रवाटेची चांगली ओळख होती. त्यांनी शिवाजीराजांना बेटापर्यंत नेले. समुद्रातल्या बेटाची महाराजांनी पाहणी केली. सागरी मार्गाने स्वराज्यावर आक्रमण करणाऱ्या शत्रूला रोखायचे असेल, तर या बेटावर एक उत्तम लढाऊ किल्ला बांधला पाहिजे, असे राजांचे मन सांगू लागले.

त्या वेळी स्वराज्याच्या संरक्षणाची मजबूत व्यवस्था करण्याची चिंता शिवाजीराजांना होती. कोकणातच मुरूडजवळ जंजिऱ्याच्या किल्ल्यात असलेल्या सिद्दी हबश्यांचे वर्चस्व कोकणच्या समुद्रावर होते. त्यांचे आरमार मोठे होते. शिवाय इंग्रज, डच, फ्रेंच, पोर्तुगीज हेही या सागरावर फिरत होतेच. शिवाजीराजांनी आपली सागरी सीमा बळकट करण्यासाठी सागरसैन्याची योजना प्रत्यक्षात आणण्याचे ठरवले. 'ज्याच्याजवळ आरमार त्याचा समुद्र' हे त्यांनी ओळखले आणि कुरटे बेटावर दुर्ग उभारण्याचा संकल्प सोडला.

सोळाशे चौसष्टच्या नोव्हेंबर महिन्यात दुर्गाची पायाभरणी होऊन काम सुरू झाले. दुर्ग असा मजबूत हवा, की कितीही मोठ्या आक्रमणापुढे तो टिकला पाहिजे. शिवाजीराजांनी खर्चाची पर्वा केली नाही. ऐंशी हजारांहून अधिक होन तर नुसत्या तटाच्याच बांधकामाला

खर्च झाले. पाचशे खंडी शिसे पायात ओतून तीस फूट उंचीचा तट उभा केला.

मधल्या काळात स्वराज्यावर आक्रमणे होत राहिली. पण गडाचे काम राजांनी थांबू दिले नाही. गोविंद विश्वनाथ प्रभूंच्या आणि हिरोजी इंदलकरांच्या देखरेखीखाली गड उभा राहिला. हा गड म्हणजे स्वराज्याचा पहारेकरी, सिद्दीलाही जरब बसवणारा. हा जलदुर्ग म्हणजे मराठ्यांच्या सागरी सामर्थ्याचीच प्रतिष्ठापना होती. मराठ्यांच्या आरमाराची उत्तम उभारणी इथे झाली. मायनाक भंडारी यांच्या हाताखाली मराठी राज्याचे स्वतंत्र लढाऊ आरमार इथे निर्माण झाले.





सिंधुदुर्ग हे शिवाजीराजांच्या दूरदर्शी आणि कल्याणकारी दृष्टीचे प्रतीक आहे. सिंधुदुर्ग म्हणजे एक देखणा आणि बुलंद दुर्ग आहे. तीन-चार मीटर रुंदीची या दुर्गाची तटबंदी नागमोडी वळणांची आहे. तिला बेचाळीस बुरूज आहेत. वर-खाली ये जा करण्यासाठी पंचेचाळीस जिने आहेत आणि तोफा ठेवण्यासाठी बुरुजांवर अर्धगोल चौथरे बांधलेले आहेत.

मालवण शहराच्या बाजूला किल्ल्याचा महादरवाजा आहे. तोही सहज दिसणारा नव्हे. घेराचा तट दोन्ही अंगांनी आत वळत गेला आहे. त्यामुळे तयार झालेल्या चिंचोळ्या खिंडीतून महादरवाजापर्यंत जावे लागते. या गडाचे बुरूज आता कुठे कुठे ढासळत आहेत. तटाचा काही भाग कोसळतो आहे. कुठून कुठून समुद्राचे खारे पाणी किल्ल्यात शिरते आहे. या पडझडीची दखल घेऊन योग्य उपाययोजना केली पाहिजे, असे आपल्याला इथे हिंडत असताना सारखे वाटत राहते.

आपण महाराजांचे गुण आठवत हा दुर्ग पाहावा.इथे एके ठिकाणी चुन्यामध्ये उमटलेला शिवरायांच्या डाव्या पायाचा आणि उजव्या

हाताचा ठसा दाखवतात. इथल्या शिवराजेश्वर मंदिरात शिवाजीराजांची मूर्तीही स्थापन केलेली आहे. वीरासन घालून बसलेली ती मूर्ती पाहताना तो सामर्थ्यवंत, वरदवंत, नीतिमंत जाणता राजा मनोमन आठवावा.

दुर्ग — किल्ला. **होन** — शिवकालीन नाणे. **दूरदर्शी** — दूरवरचा विचार करणारा. **प्रतीक** — चिन्ह. **वरदवंत** — आशीर्वाद देणारा.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) शिवाजी महाराजांना सागरी किल्ला बांधावा असे का वाटले?
  (२) मालवणचा दुर्ग मजबूत व्हावा यासाठी महाराजांनी काय केले?
  (३) शिवाजी महाराजांच्या अंगी कोणते गुण होते?

- **जोड्या जुळवा, पुन्हा लिहा.**
  **अ - गट** — विस्तीर्ण, लढाऊ, खारे, जाणता.
  **आ - गट** — राजा, पाणी, दुर्ग, आरमार, समुद्र.

- **सिंधुदुर्ग कसा बांधला त्याबाबत पाच ते सात वाक्ये लिहा.**

व्याकरण

**खालील नामांचे वचन ओळखून वेगळी यादी करा.**
वर्षे, कोळी, गोष्ट, बंदरे, सागर, वाटा, किल्ले, समुद्र, जलदुर्ग, तोफ, भिंती, जिना.

**वचन बदलून वाक्ये पुन्हा लिहा.**
(क) ते **भिल्ल** चोरी करत.
(ख) अहिल्यादेवींनी **देवळे** बांधली, **मशिदी** उभारल्या.
(ग) ती **स्त्री** लढाई करत असे.

# १९. महाराष्ट्र गीत

जय जय महाराष्ट्र
जय महाराष्ट्र माझा

मराठवाडा विदर्भ आणि
कान्ह देशचे शेतमळे
गोमांतक नंदनवन माझे
कोकण फुलवी फुले फळे
तापी पूर्णा गोदा कृष्णा
इंद्रायणी आणिक भीमा
जीवन अर्पित पुढे चालल्या
देश बांधवांच्या कामा
माय माउल्या गिरिजा ॥ १ ॥

ज्ञानेश्वर एकनाथ तुकया
समर्थ संतांची माला
मानवतेचे बीज रोवुनी
सदा जागविती आम्हांला
वंद्य शिवाजी पहिले बाजी
लोकमान्य ऐसे वीर
स्वातंत्र्याचा मंत्र देउनी
केला ज्यांनी संचार
दावुनिया निज तेजा ॥ २ ॥



संकट येता लढलो आम्ही
धाव घेत उत्तरेकडे
भारत देशा संरक्षाया
सैन्य आमुचे सदा खडे
परंपरेने देत आम्हांला
शक्ती आणि वेदना धडे
करात कर घालुनी चालल्या
बुद्धी आणि भावना पुढे
उघड हृदय दरवाजा ।। ३ ।।



## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

(१) कवितेत महाराष्ट्रातील कोणकोणत्या भागांचा उल्लेख केला आहे?

(२) महाराष्ट्रातील कोणत्या प्रमुख नद्यांचा उल्लेख या पाठात आलेला आहे?

(३) आपले सैन्य नेहमी कशासाठी सिद्ध असते?

- **पुढील संतांनी लिहिलेल्या एकेका ग्रंथाचे नाव लिहा.**

ज्ञानेश्वर, रामदास, एकनाथ.

- **कवितेतील खालील अर्थाच्या ओळी लिहा.**

(१) देशबांधवांसाठी जीवन समर्पित करत पुढे पुढे जात आहेत.

(२) बुद्धी आणि भावना परस्पर सहकार्याने चालल्या आहेत.

- **महाराष्ट्रातील दोन थोर राष्ट्रीय नेत्यांची नावे लिहा.**

- **महाराष्ट्र गौरव गीते मिळवा व त्यांतील एक गीत पाठ करा.**





# २०. पं. नेहरूंच्या पत्रांतून

प्रिय इंदिरा,

तुला एकच संदेश द्यावासा वाटतो, की तू शूर हो. सूर्याशी मैत्री कर. प्रकाशात मार्ग शोध. आई-बापांना वाटतं, की सगळे सद्‌गुण आपल्याच मुलांच्या अंगात असायला पाहिजेत. सगळ्या चांगल्या गोष्टी त्यांनाच मिळाल्या पाहिजेत. पण आयुष्यातल्या सर्वच्या सर्व चांगल्या गोष्टी आपणासच कशा मिळणार? त्यांपैकी काही गोष्टी निवडून त्या मिळवण्याचं ध्येय समोर ठेवलं पाहिजे. कारण आयुष्यात काहीतरी ध्येय असणं आवश्यकच असतं. ज्यांना ध्येय नाही ते समाजाला केवळ भार ठरतात. झाडावरचं बांडगूळ असतं ना तसं.

पण ज्यांच्या मनात सतत संघर्ष चालू असतो, ते ध्येय निश्चित करू शकत नाहीत. संघर्षाचं कारण असतं संशय, तसंच निर्णय न घेण्याची वृत्ती. तसं करावं की न करावं? पण कोणत्या तरी एका बाजूनं निर्णय घेतल्याशिवाय प्रश्न सुटणार कसा? मग परिणाम काहीही होवोत. त्यामुळं इतर काही प्रश्न कदाचित उभे राहतील, पण भंडावणारा प्रश्न तर सुटेल ना. पण म्हणून काय करू असं म्हणून सारखं मागे वळून पाहू नये. भूतकाळात गुंतण्यात काय हशील? तो बदलता येत नाही. उलट भूतकाळात गुंतल्यामुळं वर्तमान आणि भविष्य हे दोन्ही आपल्या हातून निसटतात. हाती काहीही लागत नाही. पुढं काही मिळेल याची आशा उरत नाही. मग दुःखात भर पडते आणि आपण दुःखाच्या डोहात गटांगळ्या खाऊ लागतो.

वास्तविक पाहता वर्तमान आणि भविष्यकाळ महत्त्वाचे असतात. वर्तमानकाळ नेहमी बदलत असतो. आपण तो बदलवू शकतो. भविष्यकाळ म्हणजे ओली माती. तिला देऊ तो आकार येतो. तसा प्रयत्न मात्र केला पाहिजे. तेव्हा हे दोन्ही काळ तुमच्या हाती आहेत. त्यांना यशस्वीपणं तोंड द्या. त्यासाठी त्वरित निर्णय घेणं आवश्यक असतं. साधक-बाधक गोष्टींचा विचार करून त्वरित निर्णय घ्या आणि त्याहून महत्त्वाचं म्हणजे तो निर्णय अमलात आणा. निर्णय न घेणं म्हणजे संशय आणि भय यांच्या जंगलात भटकण्यासारखं आहे. तिथं काही हाती लागण्याऐवजी असलेलंही हरवण्याचीच शक्यता अधिक. तेव्हा एखादी गोष्ट तुमच्यापुरती म्हणून लहान असो की समाजाविषयी असल्यानं मोठी असो, त्याबाबतीत प्रश्न उद्भवले की ते लगेच सोडवले पाहिजेत आणि पुढे गेलं पाहिजे. हातून काही निसटलं म्हणून दुःख करण्याचं कारण नाही. जे नाही त्याबद्दल खंत करण्याचंही कारण नाही. उगाच तक्रार करत बसू नये, आपल्या दुःखासाठी

दुसऱ्यास जबाबदारही धरू नये. शाळा-कॉलेजात हेच शिक्षण मिळालं पाहिजे.

मी समाजात वावरलो आणि समाजात मला ते मिळालं, नव्हे तिथं मी ते स्वतः मिळवलं. कोण कुणाला शिकवणार? माणसाला नेहमी कल्पना करणं आवडतं. लहानपणी मनात कल्पनाच कल्पना असतात. पुष्कळ माणसं मोठी झाल्यावरही त्या कल्पनांतच रममाण होतात. त्यांच्या जीवनात उभे राहणारे प्रश्न त्यामुळे सुटत नाहीत. कारण मन परिस्थितीशी लढण्याकरता मुक्त राहात नाही.



**संदेश** — हितोपदेश. **बांडगूळ** — परोपजीवी वनस्पती. **निर्णय** — निकाल. **हशील** — फायदा, अर्थ. **साधक-बाधक** — योग्य-अयोग्य. **खंत** — खेद.

### स्वाध्याय

- **पं. नेहरूंनी केलेला उपदेश पाच वाक्यांत लिहा.**

- **रिकाम्या जागी योग्य शब्द भरा.**

  (१) भूतकाळात ............................ काय हशील?

  (२) आपण दुःखाच्या ............ गटांगळ्या खाऊ लागतो.

  (३) त्यांना ............................ तोंड द्या.

  (४) ............................ नेहमी बदलत असतो.

  (५) ते समाजाला केवळ भार ............................

- **खालील वाक्प्रचारांचा अर्थ लिहून त्यांचा वाक्यात उपयोग करा.**

  (१) भार ठरणे, (२) तोंड देणे, (३) हाती लागणे.

मराठीत तीन काळ आहेतः वर्तमानकाळ, भूतकाळ आणि भविष्यकाळ.
खालील वाक्ये वाचा.

श्याम पुस्तक **वाचतो.**

श्यामने पुस्तक **वाचले.**

श्याम पुस्तक **वाचील.**

या वाक्यांतील वाचतो, वाचले, वाचील या क्रियापदांवरून क्रिया केव्हा घडली, केव्हा घडेल ते कळते आणि वाक्याचा अर्थ पूर्ण होतो.

**वाचतो** — या क्रियापदावरून क्रिया सध्या घडत आहे हे कळते, म्हणून तो वर्तमानकाळ.

**वाचले** — या क्रियापदावरून क्रिया पूर्वी घडली आहे हे कळते, म्हणून तो भूतकाळ.

**वाचील** — या क्रियापदावरून क्रिया पुढे कधीतरी घडेल हे कळते, म्हणून तो भविष्यकाळ.

- **खालील वाक्यांतील काळ ओळखा.**

(क) पं. नेहरू भारताचे पंतप्रधान होते.

(ख) सर्व चांगल्या गोष्टी आपणांस कशा मिळतील?

(ग) आपल्या भारतात लोकशाही आहे.

# २१. गाऊ त्यांना आरती

मित्रांनो, आज मी तुम्हांला एका आधुनिक वीराची गोष्ट सांगणार आहे. त्याचे नाव आहे निर्मलजितसिंग सेखो.

निर्मल भारतीय वायुसेनेत फ्लाईंग ऑफिसर होता. तो नॅट जातीची छोटी विमाने चालवत असे. त्याला नेहमी वाटायचे, अशी नुसती सरावासाठी विमाने काय चालवायची? युद्धाची संधी मिळाली पाहिजे. त्याला ती संधी मिळाली.

३ डिसेंबर, १९७१! पाकिस्तानने भारतावर अचानक हल्ला केला. तेव्हा निर्मल अंबाल्याला होता. तिथेच त्याला आदेश मिळाला आणि श्रीनगरच्या विमानतळाचे संरक्षण करण्याच्या कामगिरीवर त्याला पाठवण्यात आले.

१४ डिसेंबरचा दिवस. सकाळची वेळ. पाकिस्तानची सहा विमाने श्रीनगरच्या रोखाने हल्ला करायला येत आहेत, असे रडारवर आढळून आले. त्यांचा समाचार घेण्याची जबाबदारी निर्मलजित आणि त्याच्या एका मित्रावर सोपवण्यात आली.

निर्मलच्या मित्राच्या विमानाने प्रथम उड्डाण केले. त्यानंतर निर्मलच्या विमानाने आकाशात झेप घेतली. भारतीय विमाने आपल्या रोखाने येत आहेत हे समजताच पाकिस्तानच्या विमानांनी व्यूह रचला. त्यांच्या तीन विमानांनी निर्मलच्या मित्राच्या विमानाला घेरले आणि उरलेली तीन विमाने श्रीनगरच्या रोखाने येऊ लागली.

निर्मलला प्रश्न पडला. आपल्या मित्राला वाचवायला जावे की श्रीनगरच्या रोखाने येणाऱ्या विमानांचा समाचार घ्यावा? त्याने क्षणभर विचार केला व ताबडतोब निर्णय घेतला. शत्रूची विमाने श्रीनगरपर्यंत पोचली असती तर तिथल्या आपल्या विमानविरोधी तोफांनी त्यांचा समाचार घेतला असता, पण त्याचा मित्र एकाच वेळी तीन सेबर जेट

विमानांशी झुंज घेत होता, त्याला वाचवायला जाणे आवश्यक होते.

निर्मलने आपल्या विमानाचा वेग वाढवला. पाकिस्तानच्या एका सेबर जेट विमानावर पाठीमागून हल्ला केला आणि त्याचा पंखा तोडला. त्याने आणखी एका विमानाला निकामी केले. अक्षरश: पाच मिनिटांत निर्मलने शत्रूची दोन विमाने गारद केली व आपल्या मित्राचे प्राण वाचवले.

श्रीनगरच्या रोखाने जाणाऱ्या पाकिस्तानी विमानांना जेव्हा हे कळले, तेव्हा त्यांनी आपली दिशा बदलली व निर्मलच्या विमानावर झेप घेतली. त्याचा मित्र श्रीनगरकडे परत फिरला होता. पण निर्मलच्या अंगात रग होती. चार सेबर जेटशी झुंज खेळायची संधी मिळतेय, हे पाहताच त्याला आणखीनच चेव आला. त्याने एकट्याने चार



विमानांशी लढाई सुरू केली. मशिनगन्सच्या माऱ्याने त्या चारांपैकी आणखी एका विमानाला त्याने गारद केले.

त्या वेळी निर्मलच्या विमानालाही गोळ्या लागल्या होत्या. हवेत ते कलंडू लागले होते. निर्मलला अजूनही पॅराशूटच्या साहाय्याने विमानातून खाली उडी मारून स्वतःचा जीव वाचवता आला असता. पण तसे न करता त्याने त्या कलंडत्या अवस्थेत आणखी एका विमानाचा पंखा तोडला व त्याला निकामी केले. निर्मलच्या या हल्ल्याने भयभीत होऊन शत्रूच्या वैमानिकांनी पाकिस्तानकडे पळ काढला. आता आपली फत्ते झाली होती. श्रीनगरचा विमानतळ वाचला होता. श्रीनगरचा विमानतळ वाचवणे हे निर्मलचे काम होते आणि ते त्याने केले होते. आता तो दुसऱ्याच एखाद्या शेजारच्या विमानतळाकडे निघून गेला असता तर त्याबद्दल त्याला कोणीच दोष दिला नसता, पण त्याच वेळी निर्मलच्या विमानानेही पेट घेतला होता. परतीच्या वाटेवर श्रीनगरला पोहोचण्यापूर्वीच अखेर त्याचे विमान जळत्या, पेटत्या अवस्थेत खाली कोसळले होते. निर्मल मरण पावला होता.

मित्रांनो! निर्मलचे मरण मानाचे होते, मोलाचे होते. आपला देश स्वतंत्र राहावा, त्याच्यावर शत्रूची वाकडी नजर पडू नये म्हणून निर्मलने आपल्या प्राणांची आहुती दिली होती. असे हौतात्म्य पत्करल्याशिवाय स्वातंत्र्याची ज्योत अमर राहू शकत नाही. निर्मलसारख्या वीरांचा आपल्या सर्वांनाच अभिमान वाटला पाहिजे.

संगरी वीराग्रणी जे<br>
धैर्यमेरू संकटी<br>
जन्मले या भारती<br>
गाऊ त्यांना आरती!



**व्यूह** — सैन्याची विशिष्ट रचना. **गारद करणे** — नष्ट करणे. **चेव येणे** — हुरूप येणे. **फत्ते होणे** — विजय मिळणे. **हुतात्मा** — राष्ट्रासाठी प्राणाचे दान करणारी व्यक्ती. **संगरी** — युद्धात. **वीराग्रणी** — वीरांत श्रेष्ठ.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) निर्मल व त्याच्या मित्रावर कोणती जबाबदारी सोपवण्यात आली होती?
  (२) 'निर्मलचे मरण मानाचे होते' असे का म्हटले आहे?
  (३) 'गाऊ त्यांना आरती' हे नाव पाठाला का दिले असावे?

- **एका वाक्यात सांगा.**
  (१) पाठातील आधुनिक वीराचे पूर्ण नाव काय होते?
  (२) निर्मलची फत्ते झाली त्या वेळी काय घडले?
  (३) निर्मलला जय मिळाल्याचा आनंद का लुटता आला नाही?

- **कोणत्याही चार हुतात्म्यांची नावे लिहा.**

- **खालील वाक्यांतील क्रियापदे ओळखा.**
  (१) त्याच्या विमानास पाकिस्तानच्या विमानांनी घेरले.
  (२) भारतीयांनी पाकिस्तानशी युद्‌ध करून जय मिळवला.
  (३) त्याने विमानाचा पंखा निकामी केला.

- **खालील क्रियापदे घालून वाक्ये तयार करा.**
  संधी मिळणे, झेप घेणे, निर्णय घेणे, प्राण वाचवणे, गारद करणे, पळ काढणे.



# २२. अखंड

एक सूर्य सर्वां प्रकाशास देतो ।। उद्योगा लावीतो ।। प्राणीमात्रा ।। १ ।।
मानवासहीत प्राण्यांचे जीवन ।। सर्वांचें पोषण ।। तोच करी ।। २ ।।
सर्वां सुख देई जनकाच्या परी ।। नच धरी दूरी ।। कोणी एका ।। ३ ।।
मानवांचा धर्म एकच असावा ।। सत्याने वर्तावा ।। जोती म्हणे ।। ४ ।।

एक चंद्र नित्य भ्रमण करीतो ।। सर्वां सुख देतो ।। निशिदिनी ।। १ ।।
भरती ओहोटी समुद्रास देतो ।। जल हालवीतो ।। क्षारांसह ।। २ ।।
पाणी तेंच गोड मेघा योगे होतें ।। संतोषी करीतें ।। सर्व प्राण्यां ।। ३ ।।
मानवांचे साठी बहु धर्म कसे ।। झालां कां हो पिसे ।। जोती म्हणे ।। ४ ।।

सर्वांसाठी एक वायु केला खास ।। घेती श्वासोश्वास ।। प्राणीमात्र ।।
वृक्षवल्लीसह सर्वांचे जिवन ।। करीतो पालन ।। जगामाजीं ।। २ ।।
वायुच्या योगाने हवा शुद्‌ध होती ।। प्राण्या सुख देती ।। निशिदिनी ।। ३ ।।
मानवांनों, तुम्ही ईशा नित्य ध्यावें ।। सर्व सूखी व्हावें ।। जोती म्हणे ।। ४ ।।





**अखंड** — जोतिबांनी अभंगाला अखंड म्हटले आहे. **पोषण करणे** — वाढवणे. **भ्रमण** — फिरणे. **वल्ली** — वेली.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) सृष्टीतले व्यवहार समानतेने चालतात हे दाखवून देण्यासाठी या कवितेत कोणती उदाहरणे दिली आहेत?
  (२) तुम्ही अशा प्रकारची आणखी कोणती उदाहरणे द्याल? (फक्त २)

- **या कवितेत 'निशिदिन' यासारखे जोडशब्द आले आहेत ते लिहा आणि त्यासारखे तुम्हांला सुचणारे आणखी तीन शब्द लिहा.**





# २३. एक भारतीय संशोधक

डॉ. शंकर आबाजी भिसे यांचा जन्म दिनांक २९ एप्रिल, १८६७ रोजी मुंबईत झाला. तो काळ पारतंत्र्याचा होता. भारतीय माणसाला प्रत्येक ठिकाणी कमी लेखले जाई. शास्त्रीय संशोधनक्षेत्रात तर त्याला अजिबात स्थान नव्हते. अशा प्रतिकूल परिस्थितीत भारताची शास्त्रीय संशोधनक्षेत्रात दिगंत कीर्ती पसरवणारे थोर शास्त्रज्ञ म्हणून डॉ. भिसे यांची गणना होते.

शंकर लहान असताना दुकानातून साखर आणण्याचे काम त्याला सांगण्यात आले. दुकानदाराने वजन-मापात खोटेपणा करून शंकरला कमी साखर दिली. त्याने हुज्जत घातली, पण दुकानदाराने त्याचे काहीच ऐकले नाही. वडिलांनीही आरोप केला, ''तू रस्त्यात साखर खाल्लीस म्हणून ती कमी झाली.''

शंकरच्या मनाला ती गोष्ट चांगलीच लागली. खरे वजन मापणारे यंत्र आपण तयार करावे असे त्याच्या मनात सतत घोळत राहिले.

१८९८ सालची ती गोष्ट. इंग्लंडमधील एका शास्त्रीय मासिकात एक स्पर्धा जाहीर झाली होती. ही स्पर्धा वजनमापक यंत्राबद्दल होती. एकाच वेळी हव्या तेवढ्या वजनाची साखर, मीठ किंवा त्यासारख्याच इतर वस्तू यांचे मोजमाप करता येण्याची सोय त्यात असावी अशी अट होती. यंत्र शोधून काढणाऱ्यास बक्षीस होते. भिसे यांच्या वाचण्यात ते आले. पण त्या वेळी यंत्राचा आराखडा पाठवण्याची मुदत लवकरच संपणार होती. परंतु त्यांनी क्षणाचाही विलंब न लावता, आराखडे तयार करून ते इंग्लंडला रवाना केले आणि काय आश्चर्य, भिसे यांच्या यंत्राचे आराखडे सर्वश्रेष्ठ ठरले आणि त्यांना बक्षीस मिळाले. या स्पर्धेत युरोप व अमेरिकेतील नामवंत यंत्रशास्त्रज्ञांनी भाग घेतला होता. त्यामुळे अमेरिकेतील 'सायंटिफिक अमेरिका' या शास्त्रीय मासिकात सदरहू शोधाचा खास उल्लेख करण्यात आला.

भिसे यांच्या या यशाची बातमी भारतात पसरली. तेव्हा नामदार गोखले, न्यायमूर्ती रानडे इत्यादी पुढाऱ्यांनी भिसे यांना परदेशात जाऊन अधिकाधिक संशोधन करण्याची विनंती केली. थोर पुढाऱ्यांचा आदेश वंदनीय मानून, भिसे यांनी १८९८ च्या मे महिन्यात इंग्लंडला प्रयाण केले.

इंग्लंडमध्ये भिसे यांनी प्रामुख्याने छपाईच्या क्षेत्रात अनेक शोध लावले. यांमध्ये 'भिसो-टाईप' व 'सिंगल टाईप कास्टर' ही यंत्रे

क्रांतिकारक ठरली. टाटांच्या सहकार्याने त्यांनी 'टाटा-भिसे सिंडिकेट' नावाची संस्था स्थापन केली.

पुढे इंग्लंडला बरीच वर्षे राहिल्यावर ते १९१४ साली अमेरिकेला गेले. अमेरिकेत त्यांनी यंत्रशास्त्राशिवाय रसायन व विद्युतक्षेत्रातही अनेक शोध लावले. त्यांचा प्रख्यात शोध म्हणजे 'ऑटोमेडिन' (ॲटोमिक आयोडिन) या गुणकारी औषधाचा होय. पहिल्या महायुद्धात या औषधाचा जखमी सैनिकांवर उपयोग करण्यात आला. अमेरिकेत हे औषध लोकप्रिय झाले. भिसे यांनी विद्युतक्षेत्रात अनेक शोध लावले. एकेरी किरण पाठवण्याच्या पद्धतीने दूरवर छायाचित्रे पाठवण्याचा त्यांचा शोध अत्यंत मोलाचा ठरला.

भिसे यांचा साठाव्या वाढदिवसानिमित्त न्यूयॉर्कमध्ये अनेक संस्थांतर्फे सत्कार करण्यात आला. संशोधन क्षेत्रात बहुमोल कामगिरी केल्याबद्दल त्यांना पीएच.डी. व डी.एस्सी. ह्या पदव्या सन्मानपूर्वक देण्यात आल्या. या सुमारास डॉ. भिसे यांची जगप्रसिद्ध संशोधक एडिसन यांच्याशी भेट झाली.

भिसे इंग्लंडमध्ये असताना इंग्लंडचे आफ्रिकेशी युद्ध सुरू झाले. या वेळी 'स्वयंचलित तोफ' काढण्याची विनंती काही कारखानदारांनी डॉ. भिसे यांना केली. त्यामुळे भिसे यांना भरपूर पैसे मिळणार होते. पण युद्धामुळे होणारी माणसांची हत्या व दैन्य यांची कल्पना भिसे यांना होती. त्यामुळे स्वयंचलित तोफ तयार करण्याचे त्यांनी नम्रतापूर्वक नाकारले व मानवतेच्या भूमिकेतून होणारा संहार आपल्या परीने वाचवला.

डॉ. भिसे यांनी सुमारे २०० शोध लावले. त्यांचे कार्य आपल्या सर्वांना सदैव प्रेरक ठरेल यात शंका नाही.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  (१) खरे वजन मापणारे यंत्र तयार करावे असे डॉ. भिसे यांना का वाटले?

  (२) डॉ. भिसे यांनी कोणकोणत्या क्षेत्रांत शोध लावले?

- **खालील वाक्ये दुरुस्त करून लिहा.**

  (१) लागली चांगलीच गोष्ट ती शंकरच्या मनाला.

  (२) ती वजनमापक होती यंत्राबद्दल स्पर्धा.

  (३) भिसे होता परतंत्र देश भारत यांच्या काळी.

- **विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

  खोटेपणा, प्रतिकूल, शास्त्रीय.

- **कोणत्याही तीन भारतीय शास्त्रज्ञांची नावे लिहा.**



# २४. कठिण समय येता

तेथील एक कलहंस तटी निजेला
जो भागला जलविहार विशेष केला ।
पोटीच एक पद, लांबविला दुजा तो
पक्षी तनू लपवि, भूप तया पहातो ॥

टाकी उपानह पदे अतिमंद ठेवी
केली विजार वरि डौरही मौन सेवी
हस्ती करी वलय उंच अशा उपायी
भूपे हळूच धरिला कलहंस पायी ॥

कलकल कलहंसे फार केला सुटाया
फडफड निजपक्षी दाविलीही उडाया
नृपतिस मणिबंधी टोचिता होय चंचू ।
धरिल दृढ जया त्या काय सोडील पंचू ॥

तदितर खग भेणे वेगळाले पळाले
उपवनजलकेली जे कराया मिळाले ।
स्वजन गवसला जो याचपासी नसे तो
कठिण समय येता कोण कामास येतो ॥





**कलहंस** — हंसाचा एक प्रकार. **तटी** — काठावर. **भागला** — थकला. **पद** — पाय. **तनू** — अंग. **भूप** — राजा. **उपानह** — जोडा. **डौर** — अंगरखा. **नृपती** — राजा. **मणिबंधी** — मनगटावर. **पंचू** — कुशलतेने पकडणारा. **खग** — पक्षी. **भेणे** — भीतीने. **उपवन** — बगीचा. **जलकेली** — जलक्रीडा.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  (१) कलहंस का झोपला होता?
  (२) कलहंसाला धरल्याचा दुसऱ्या पक्ष्यांवर काय परिणाम झाला?
  (३) इतर पक्षी का पळून गेले?

- **विरुद्धार्थी शब्द लिहा.**
  (१) अतिमंद (२) गवसला (३) स्वजन (४) लांबवला.

- **पुढील शब्दांचा वाक्यात उपयोग करा.**
  (१) चंचू (२) पंचू (३) डौर (४) केली.

- **'संकटाच्या वेळी कोणीच उपयोगी पडत नाही'या अर्थाची कवितेतील ओळ लिहा.**

- **हंसाबद्दल पाच वाक्ये लिहा.**



# २५. राजा असावा तर असा

"होईल ती शिक्षा भोगायला मी तयार आहे," जख्खड म्हातारी थरथर कापत बोलली.

"तू काय गुन्हा केला आहेस, ते तुला माहीत आहे काय ?" तिला विचारण्यात आले.

"या लोकांनी सांगितले की, मी मारलेला दगड त्यांच्या राजाच्या कानशिलावर लागला व त्यामुळे त्याला फार वेदना होत आहेत," म्हातारी म्हणाली.

"तू दगड मारला नाहीस, असं तुला म्हणायचं आहे का ?" परत तिला प्रश्न केला गेला.

"असं मी कसं म्हणेन ? एकच काय ? मी सारखे दगड मारत होते. त्यांतला एक चुकून राजाला लागला असेल," म्हातारीने सांगितले.



"पण इतके घोडेस्वार तुझ्या बाजूनं जात होते, घोड्यांच्या टापांचा केवढातरी आवाज उठत होता, तरी तुला कळले नाही की कोणीतरी सरकारी माणसं जात आहेत, तेव्हा दगड मारण्याचा आपला खेळ बंद करावा ?"

या प्रश्नाला म्हातारीने उत्तर दिले —

"सरकार, मला आधी कमी ऐकू येतं आणि त्यातून माझा नातू भुकेला होता, त्यामुळं माझं लक्ष फक्त त्याला खायला कसं मिळेल आणि त्याचा रडवा चेहरा हसरा कसा होईल, इकडे होतं. त्यामुळं माझ्याजवळून कोण गेलं हे मला कळलंच नाही. पण हा एवढा न्याय करत बसण्याअगोदर कुणाला दगड लागला तो मला दाखवा. रगतरोड, तुरटी, रक्तचंदन आणि झाडपाल्याचं औषध त्याच्या टेंगळावर मला प्रथम लावू दे."

"तुझा नातू कुठं आहे ?"



"झाडाआड लपला असेल भिऊन. सकाळपासून तो उपाशी होता, म्हणून बोरं पाडून देत होते मी त्याला. बादशहाच्या सरकारी लोकांनी त्याच्या आईबापांना त्याच्या व माझ्यादेखत जिवानिशी छळून मारलं. तेव्हापासून पोर भितं. आमच्या शेताची नासाडी केली त्या गुंड लोकांनी. आमचं घर लुटून जाळलं आणि तेव्हापासून आम्ही वनवासी झालो." म्हातारी हे सांगत असता घोडेस्वारांच्या त्या प्रमुखाच्या डोळ्यांत पाणी आले. तेव्हा म्हातारी म्हणाली —

"तू कशाला रडतोस बाबा ? आमचं कर्म आम्ही भोगतो आहोत आणि तुलाच का रे लागलं ? तूच का यांचा राजा ? तुझ्या डोळ्यांत पाणी येताच मी ओळखलं की तू काही परकी सैतानी बादशहा नाहीस. तूच आमचा पालनहार असशील. नाहीतर इतकं तुला वाटलंच नसतं !"

"आई, तुम्ही किती दगड मारले आणि किती बोरं पडली ?" त्या घोडेस्वारांच्या प्रमुखाने विचारले.

"तू मला आई म्हटलंस. धन्य आहे तुझी. अरे, माझा हात थरथरतो. सगळेच दगड काही लागत नाहीत. एखादा दगड लागतो आणि एखादं बोर पडतं," म्हातारीने सांगितले.

"हिच्या नातवाला शोधून आणा." तो प्रमुख आपल्या सोबत्यांना म्हणाला.

"नको ! नको ! तो भीतीनं घाबरेल, रडेल."

"मग तुम्ही या आमच्या लोकांबरोबर जा आणि घेऊन या त्याला." प्रमुख बोलला.

"आणते. पण मला शिक्षा झाली तरी त्याला जेवू घाला," असे म्हणून म्हातारी त्या लोकांबरोबर गेली आणि तिच्या नातवाला तिने शोधून आणले.

"पाया पड यांच्या. हे त्या बादशहाच्या लोकांसारखे नाहीत. आपले आहेत हे," म्हातारीने सांगताच नातवाने सगळ्यांच्या समोर लोटांगण घातले.

"ऊठ बाळ," प्रमुख म्हणाला. त्याने आपल्या सेवकाला सांगितले, की या दोघांचे पोट भरेल एवढे अन्न ताबडतोब द्या आणि तो पुढे म्हणाला —

"ज्याला जागेवरून हालता येत नाही, असं झाडही एक दगड लागला तर एक बोर देतं ! मग राजाला दगड लागल्यावर त्यानं



काय द्यावं? मंत्री, या बाईचं घर बांधून देण्याची व्यवस्था करा. हिचे शेत हिला परत करा आणि इतर खर्चासाठी मोहोरांची एक थैली तिला आत्ताच द्या."

राजाची आज्ञा तिथल्या तिथे अमलात येण्याची व्यवस्था मंत्र्यांनी केली, तेव्हा म्हातारी म्हणाली —

"तुझी कीर्ती जगभर पसरेल राजा. तुझं नाव मी देवाच्या नावासारखं जपेन. आधी मी तुझ्या पाया पडते."

घोडेस्वारांचा तो प्रमुख म्हणाला, "हां, हां, हे काय ? तू माझ्या आईप्रमाणे मोठी आहेस. मला तुझा आशीर्वाद दे. मी पाया पडतो," असे तो घोड्यावरून उतरून म्हणाला आणि म्हातारीच्या पायांना त्याने स्पर्श केला. म्हातारीचा ऊर भरून आला. दगड



लागून सुजलेल्या त्याच्या कानशिलावरून तिने मायेचा हात फिरवला आणि तिच्या डोळ्यांतून प्रेमाचे पाझर वाहू लागले. तिने परत विचारले,

"माझ्या राजा, तुझं नाव नाही अजून सांगितलंस ?"

"महाराजा रणजितसिंग. असं यांचं नाव आहे आई," राजाचा मंत्री बोलला.

म्हातारीने आशीर्वाद दिला, "सुखानं राज्य करा. आपला आणि परकी बादशहा यांमधला फरक मला आज पुरा कळला."

महाराजा रणजितसिंग आणि त्याचे सहकारी घोड्यांवर स्वार झाले. ते दिसेनासे होईपर्यंत म्हातारी आपल्या नातवासह त्यांच्या जाण्याच्या दिशेला पाहत राहिली आणि म्हणाली, "राजा असावा तर असा!"



## स्वाध्याय

- उत्तरे लिहा.
  - (१) म्हातारी दगड का मारत होती ?
  - (२) घोडेस्वार प्रमुखाच्या डोळ्यांत पाणी का आले ?
  - (३) तो प्रमुख आपला पालनहार आहे हे म्हातारीने कसे ओळखले ?
  - (४) राजाला दगड लागला असूनही त्याने म्हातारीला मोहोरांची थैली का दिली ?
- आदर्श राजा कसा असावा हे पाठाच्या आधारे एका परिच्छेदात लिहा.
- विरुद्धार्थी शब्द लिहा.

  रडवा, गुंड, खर्च, सैतान, आशीर्वाद.



# २६. माझे दत्तक वडील

मला पुण्यास नोकरी होती, तरी मी दरसाल रत्नागिरीस येत असे व माझ्या वडिलोपार्जित इस्टेटीपैकी माझ्या वाट्याला जे नारळाचे झाड व फणसाच्या झाडाची जी फांदी आली तिचे वार्षिक उत्पन्न एक रुपया, पाच आणे, पाच पै घेऊन जात असे. यंदाच्या वाटणीचे पैसे मी कालच वसूल केले होते व आज संध्याकाळच्या बोटीने परत पुण्यास जाणार होतो. तोच एक पन्नाशीच्या सुमाराचा वृद्ध गृहस्थ घाईघाईने मजकडे येत आहे असे पाहून थबकलो. तो गृहस्थ धावतच माझ्याजवळ आला व त्याने अंगाभोवती दोन्ही हात टाकून मला कवटाळले.



"अहो, हे काय आजोबा? सोडा मला."

"बाळ, नको रे असा म्हाताऱ्याला झिडकारू. तोच तू — अगदी हुबेहूब !"

"अहो आजोबा, कबूल आहे सगळं. तोच मी आहे. हुबेहूब काल दिसत होतो तसाच आजही दिसतो आहे. कालचा हा चिमणाजी विठ्ठल—"

"काय चिमण तुझं नाव? मग तर जमलंच. चिमण, चिमण ! ये रे माझ्या चिमण्या बाळा !" असे उद्गार काढत म्हातारबुवांनी मला अधिकच आवळले.

"अहो शास्त्रीबुवा, तुम्ही वेड्याच्या इस्पितळातून रखवालदाराच्या हातावर तुरी देऊन तर नाही ना आला ?"

"अरे बाळा, मी कोणाच्या हातावर तुरी देऊन आलो नाही, पण तू मात्र माझ्या हातावर तुरी देऊन वीस वर्षं पळाला होतास. पण सुदैव माझं, काल रात्री गुरुराजांनी स्वप्नात येऊन सांगितलं, की तुझा बाळ उद्या सकाळी तुला भेटलाच पाहिजे. मी म्हटलं, 'पण त्याला ओळखणार कसा ?' तेव्हा गुरुराजांनी स्वप्नात तुझं दर्शन घडवलं. आता चल माझ्या घरी."

या वेड्याच्या डोक्यात आहे तरी काय हे पाहायच्या उद्देशाने मी त्याच्याबरोबर त्याच्या घराकडे जाण्यास निघालो. दहा-पाच घरे गेल्यावर त्याच्या घरी पोहोचलो. आत गेल्याबरोबर तेथील थाट पाहून मी थक्क झालो.

म्हाताऱ्याने रामा गड्यास हाक मारून बोलावले आणि थोडी केळी आणि एक पपनस घेऊन येण्यास सांगितले.

रामा म्हणाला, "पन अन्ना..."

रामास पुरते बोलू न देता म्हातारा त्यास गप्प करून म्हणाला,

''होय मालकांचेच पाहुणे आहेत हे. जा, जास्त बोलू नको.'' रामा काहीतरी पुटपुटत गेला.

म्हातारा ओरडून म्हणाला, ''अहो बाईसाहेब, जरा बाहेर या.'' एक बाई माजघरातून दारात येऊन उभी राहिली. तिला उद्देशून म्हातारा म्हणाला, ''हे पाहिलेत काहो आपले चिरंजीव ? झालं की नाही माझं स्वप्न खरं ? नावसुद्धा गुरुराजांनीच सांगितलेलं— चिमणाजी !''

मग म्हातारा झोपाळ्यावरून उठला व भिंतीवरचा एक फोटो काढून मला दाखवत म्हणाला, ''चिमणराया, पाहा पाहा ही गोजिरवाणी बाळं ! एकाहून एक सरस रत्नंच होती; पण काळाला नाही ती पाहावली ! इन्फ्ल्युएंझाच्या साथीत आठ दिवसांत एकामागून एक गेली.''



अण्णांनी आपल्या जमीनजुमल्याची कल्पना मला करून दिली. अण्णांच्या जवळ बरीच माया होती. तो बंगला, ती बाग, रत्नागिरी व संगमेश्वर तालुक्यातील भातशेते, दरमहा तीनशे रुपये भाडे आणणारे मुंबईचे लहानसे घर, शिवाय वीस हजारांच्या नोटा असले घबाड आयतेच पदरात पडत असल्यावर कोणता शहाणा माणूस अण्णांच्या स्वप्नावर अविश्वास ठेवील ?

"पण अण्णा, मला तुमचा दत्तक होता येणार नाही बरं का !" मी म्हटले.

"अरे दत्तक नको अन् फित्तक नको. फक्त तू आमच्यावर माया कर म्हणजे माझी सगळी माया तुलाच मिळेल बरं. वरच्या आळीतले जोग, ते तुझे कोण लागतात ?"



मी अण्णांना माझी सगळी हकीकत सांगितली. मी पुण्यास नोकरीला असतो असे ऐकल्यावर ते म्हणाले, "अरे चिमणा ! साठ टिकल्यांकरता खर्डेघाशी करण्याचं आता तुला कारण नाही, परंतु मला जरा दम्याची व्यथा असल्यानं एवढा पावसाळा आम्ही दोघं पुण्यास काढू. स्वतंत्र बिऱ्हाडच करणार होतो; पण आता तू आहेसच. घरी तुझी आई आहे ना ? तुला उद्या सोमवारी कामावर रुजू व्हायचं असेल तर तू आज जा. मी इथल्या कामाची व्यवस्था लावून बुधवारी निघून येतो."

संध्याकाळी घरी गेल्यावर आईला सगळी हकीकत सांगितली. तेव्हा ती म्हणाली,"संभाळ हो बाबा ! नाही तर तो कोणी लफंगा-बिफंगा असायचा —"

"अग पण आई, मी का या मसलतीत पडलो आहे ? त्या अण्णाच्या गुरुरायांनीच मला यात पाडलं आहे. ठीक आहे. या महागाईच्या दिवसांत हातभार लावला संसाराला आपल्या दैवानं !"

गुरुवारी सकाळी अण्णा व त्यांची पत्नी यांस स्टेशनवरून आणले. अण्णांच्या बरोबर त्यांच्या कपड्यांच्या व दागदागिन्यांच्या ट्रंका होत्या, पण त्यांच्या किल्ल्या कोठेतरी हरवल्या, त्यामुळे त्यांना अंघोळीनंतर बदलायला चिरगुटेही नव्हती. म्हणून मी लगेच बाजारात जाऊन एक धोतरजोडी व इरकली लुगडी घेऊन आलो.

अण्णा आल्यापासून आमच्या राहणीत पुष्कळ सुधारणा झाली. जेवताना भाकरीऐवजी पोळी, पोळीला तूपसाखर, सकाळ-दुपार चहा व बरोबर बिस्किटे अगर शिरा असा थाट सुरू झाला. अण्णांचा पंचा जाऊन लांबरुंद धोतर व वहाणांऐवजी जोडा असा पेहराव आला. माईचे सुती लुगडे जाऊन इरकली लुगडे व

अनवाणी पायांत चपला आल्या. या सगळ्या वेशांतराचा खर्च तूर्त मला सोसावा लागला; पण याचा दसपट वचपा काढल्याशिवाय मी राहणार होतो थोडाच !

अण्णांनी आपल्या ट्रंकेच्या कुलपाच्या किल्ल्या पाठवून देण्याबद्दल रत्नागिरीच्या कारकुनास दहा पत्रे लिहिली; पण त्याने दाद दिली नाही. त्यामुळे खर्चासाठी बँकेतील माझे १२० रुपये मला काढून आणावे लागले.

हळूहळू दोन महिने संपले. माझे बँकखाते खलास झाले. पगारही संपला होता; पण अद्याप अण्णांच्या किल्ल्या येईनात, तेव्हा त्यांनी पाचशे रुपये रजिस्टरने ताबडतोब पाठवून देण्याविषयी रत्नागिरीच्या आपल्या कारकुनास लिहिले व ते येईपर्यंत खर्चास मी माझ्या सासऱ्याकडून दोनशे रुपये उसने आणले.

पंधरा दिवस होऊन गेले तरी रजिस्टर येईना.

मग माझ्या सासऱ्यांनी मला सल्ला दिला की, मी प्रत्यक्ष रत्नागिरीस जाऊन त्या म्हाताऱ्याच्या कारकुनास भेटावे व त्याच्याकडून पैसे आणावे. मी रत्नागिरीस गेलो व तेथे भाऊबंदांकडे उतरलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी अण्णांच्या बागेतील बंगल्यात गेलो. पूर्वी मी येथे आलो होतो, तेव्हा बंगल्याच्या माडीस कुलूप होते; परंतु या वेळी अण्णा पुण्यास असून ती उघडी असल्याने मला नवल वाटले. मी ओसरीवर गेलो व पाहातो तो झोपाळ्यावर तीन सुरेख मुले बसलेली. ही भुताटकी तर नाही ना असे मला वाटले. कारण ज्या मुलांचा फोटो दाखवून ही माझी गोजिरवाणी बाळे इन्फ्ल्युएंझाच्या साथीत गेली असे अण्णा म्हणाले होते तीच ही मुले. पोशाखही तेच होते.

मजकरता केळी व पपनस आणण्यासाठी अण्णांनी ज्याला पाठवले होते तो रामागडी तेथे काही कामाकरता आला व माझ्याकडे पाहताच "काय पाव्हणे कसा काय ?" असे त्याने विचारले.

"ठीक आहे; पण ते अण्णा कुठे आहेत रे ?"

"तो अण्णा कुठे पलाला त्याचा काहीच पत्ता नाय."

"म्हणजे ते अण्णा या बंगल्याचे मालक नव्हते ?"

"अवं कसले मालक ? वैनीबाईस्नी पुसा म्हणजे त्या सांगतील सगळं."

वैनीबाई म्हणाल्या, "तो अण्णा आमच्याकडं नोकरी मागायला आला. त्याला कारकून म्हणून ठेवलं. मध्ये आम्ही लग्नकार्याकरता मालवणास गेलो ते त्याच्या अंगावर घर टाकून गेलो. कोणाला माहीत हा अण्णा असा लबाड असेल म्हणून. मेला, तुम्हांला काय त्याने आपणच घरचे मालक आहो, म्हणून सांगितलं ? काय बाई तरी धारिष्ट्य !"

म्हणजे, त्या लबाड माणसाने मला बनवले. धनाच्या लोभानं मी पार बुडालो. आता पुण्यास घरात पाऊल टाकताच अण्णाच्या बत्तिशीपैकी शिल्लक राहिलेले दात न पाडीन तर नावाचा चिमणराव विठ्ठलच नाही, असे सूडाचे विचार मनात घोळवत पुण्यास पोचलो.

तांग्यातून उतरताच, "कुठं आहेत अण्णा ?" असे म्हणत मी घरात शिरलो.

"अरे, असं झालं तरी काय रागवायला ?" असे आईने विचारले.

"पण आधी ती दोघं..."

"अरे, ती गेली रत्नागिरीला. दोन ट्रंका बरोबर नेल्या, आणखी दोन वर आहेत."

"पाहू बरं त्यांत काय आहे — चोराच्या हातची लंगोटी," असे म्हणून मी वर गेलो. कुलपे फोडून ट्रंका उघडून पाहतो तो आत दगड-विटकरीशिवाय काही नव्हते !



**वडिलोपार्जित** — वडिलांनी कमावलेली. **हातावर तुरी देणे** — फसवून पळ काढणे. **माया** — प्रेम, पैसा. **खर्डेघाशी करणे** — कारकुनी करणे. **व्यथा** — दुःख, आजार.

## स्वाध्याय

- उत्तरे लिहा —

(१) चिमण दरसाल रत्नागिरीस का जात असे ?
(२) चिमणने वृद्ध गृहस्थांना का झिडकारले ?
(३) चिमणने वृद्ध गृहस्थांच्या घरी जायचे का ठरवले ?
(४) घरी गेल्यावर वृद्ध गृहस्थांनी चिमणला काय करायला लावले ?
(५) लेखकाच्या घरी राहायला आल्यावर वृद्ध गृहस्थांनी काय केले ?

- **असे कोणी कोणास म्हटले ?**

(१)"तू मात्र माझ्या हातावर तुरी देऊन वीस वर्षं पळाला होतास."
(२)"पाहू बरं त्यांत काय आहे — चोराच्या हातची लंगोटी."

- **चिमणची फसवणूक कोणत्या प्रकारे झाली, यावर एक परिच्छेद लिहा.**
- **खालील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.**

(१) हातावर तुरी देणे. (२) घबाड पदरात पडणे. (३) खर्डेघाशी करणे. (४) वचपा काढणे. (५) अंगावर घर टाकणे.



# २७. न्याय

जुम्मन शेख आणि अलगू चौधरी हे एकमेकांचे जिवलग मित्र. भले त्यांचे धर्म वेगवेगळे असोत; पण मैत्री अगदी गाढ होती.

जुम्मन शेखच्या धाकात सारा गाव होता; आणि अलगू चौधरीच्या घरी श्रीमंती पाणी भरत होती.

जुम्मन शेखची एक म्हातारी मावशी होती. तिला मूलबाळ कोणी नव्हते. तिचा थोडासा पैसाअडका, जमीनजुमलाही होता. जुम्मन शेखने म्हाताऱ्या मावशीची ही जायदाद स्वतःच्या नावे करून घेतली. ती ताब्यात येईपर्यंत त्याने मावशीची खूपच काळजी घेतली. तिची खूप सेवा केली; पण मग मात्र सगळा मोहरा फिरला. मावशीबाईंची सेवा करणे त्याने हळूहळू सोडून दिले. तिला दोन वेळच्या जेवणाबरोबर झणझणीत तिखट बोलणीही ऐकायला मिळू लागली.

काही दिवस म्हातारीने हाल सोसले; पण पुढे पुढे जुम्मनच्या बायकोचा जाच तिला सोसवेनासा झाला. एक दिवस तिने धीर करून म्हटले, ''बाळा, तुमच्या दोघांच्या संसारात माझं म्हातारीचं पटेल असं काही वाटत नाही. तू आपला मला दरमहा खर्चाला थोडे पैसे देत जा, म्हणजे मी माझी वेगळी राहत जाईन.''

जुम्मनने मावशीचे हे बोलणे ऐकले आणि तिला निलाजरेपणाने म्हणाला, ''अरे वा! रुपये काय झाडाला लागतात होय?''

म्हातारीची सहनशीलता आता मात्र संपली. तिने जुम्मनला म्हटले, ''मी तुझी ही करणी पंचायतीसमोर मांडेन बरं पोरा!'' पण जुम्मनला पंचायतीची भीती नव्हती. ''खुशाल बोलाव पंचायत,'' तो म्हणाला. कारण सारा गाव त्याच्या मुठीत! त्याच्याशी शत्रुत्व कोणाला परवडणार?

म्हातारी मावशी गावभर हिंडली. तिचे दुःख ऐकून लोक हळहळले;



पण तिच्यासाठी जुम्मनशी वैर करायला कुणीच तयार झाले नाही. म्हातारी शेवटी अलगू चौधरीकडे येऊन म्हणाली, ''तू जरा चल बेटा. चल पंचायतीत.''

''मी येऊन काय करू मावशी? जुम्मन माझा मित्र आहे. मी तुझ्या बाजूनं बोलून त्याच्याशी वाकडं घेणार नाही,'' अलगूने उत्तर दिले. म्हातारीने क्षणभर त्याच्याकडे पाहिले आणि म्हणाली, ''अरे पोरा, वैराच्या भीतीपायी तू सत्यसुद्धा सांगणार नाहीस? तुझ्यात देव आहे की नाही?''

म्हातारी उठून गेली; पण तिचे ते शब्द मात्र अलगूला सारखे आठवत राहिले. संध्याकाळी झाडाखाली पंचायत भरली. म्हाताऱ्या मावशीने आपली कर्मकथा लोकांसमोर मांडली आणि म्हणाली, ''मला न्याय द्या. पंच परमेश्वर असतो. मी पंचाचा निर्णय मानीन.''

जुम्मनचा एक मित्र रामधन मिश्र म्हणून होता. त्याने जुम्मनला विचारले, ''बोल जुम्मन पंच कोण असावा?'' ''कुणीही चालेल. म्हातारी निवाडा करेल तो पंच मला चालेल.'' बेफिकिरीनं जुम्मनने उत्तर दिले.

मावशी म्हणाली, ''तुझा मित्र अलगू चौधरीच पंच बनेल.'' अलगू चौधरी म्हातारीचे बोलणे ऐकून घाबरला. तो सगळ्यांसमोर म्हणाला, ''मावशीबाई, तुला तर माहीत आहे आमची मैत्री. उगाच मला कशाला पंच नेमतेस?''

पण म्हातारी गंभीरपणे म्हणाली, ''हे बघ अलगू, पंचाच्या मनात देवच असतो असं मी मानते. मैत्रीखातर कुणी सत्य विकत नाही समजलास? तू बोल. तुझ्या तोंडून देवच बोलेल.''

आणि अलगू चौधरी पंच झाला. दोन्ही पक्षांनी आपले म्हणणे पंचासमोर मांडले. अलगूने निवाडा केला, ''म्हाताऱ्या मावशीबाईला जुम्मन शेखने दरमहा खर्चाची रक्कम देत जावी आणि जर हा निवाडा मंजूर नसेल तर म्हातारीची मालमत्ता तिला परत दिली जावी.''

निवाडा ऐकला आणि जुम्मन एकदम हबकला. काल-परवापर्यंत आपल्या जिवाचा जिवलग असलेला मित्र अशा रीतीने आपल्या विरोधी निवाडा करून आपली अब्रू वेशीवर टांगेल, असे त्याला मुळीच वाटले नव्हते. तो मनातून संतापला. मग त्या दिवसापासून दोघांच्या मैत्रीला आपोआप ओहोटी लागली आणि जुम्मन अलगूचा सूड घेण्याची संधीच शोधत राहिला.

अन् तशी संधी लवकरच आली. काय झाले, की वर्षापूर्वी अलगू चौधरीने एक सुंदर बैलजोडी विकत घेतली होती. अतिशय उत्तम जातीचे बैल होते. त्यातला एक बैल अचानक मेला.

आता जोडीतल्या दुसऱ्या बैलाचा काय उपयोग? गावातल्याच एका एक्केवाल्याला अलगूने दुसरा बैल विकून टाकला. एक महिन्याने पैसे चुकते करायच्या बोलीवर त्याने बैल विकत घेतला. नवीन दमदार बैल! एक्केवाल्याला मग भान राहिले नाही. जिथे पूर्वी गुळाच्या ढेपा लादून बाजाराची दिवसाला एक खेप व्हायची तिथे चार-चार खेपा

होऊ लागल्या. बिचारे जनावर! महिन्याच्या आतच रस्त्यात मरून पडले.

अलगू महिन्याभराने पैसे मागायला गेला तेव्हा एक्केवाल्याने सरळ त्याला हाकलून दिले. ''आम्हांला फसवलं, अर्धमेला बैल गळ्यात बांधला आणि वर पैसे मागतोय!'' भांडण वाढत गेले. शेवटी पंचायतीसमोर निवाडा करायचे ठरले.

संध्याकाळच्या वेळी पंचायत बसली तेव्हा रामधन मिश्राने विचारले, ''सांग अलगू चौधरी, पंच कोण?''

''एक्केवाला सांगेल तो पंच,'' अलगूने उदारपणे म्हटले.

''तर मग माझा पंच जुम्मन शेख,'' एक्केवाल्याने म्हटले.

अलगू चौधरीचा चेहरा एकदम उतरला. त्याला पूर्वीच्या पंचायतीची आठवण झाली. जुम्मन आता त्या जुन्या घटनेचा बदला घेणार, याविषयी त्याला शंका उरली नाही.

जुम्मन शेख शांतपणे पंच म्हणून समोर येऊन बसला खरा, पण त्याचे मन त्याला म्हणू लागले — 'हे पद जबाबदारीचं आहे. गड्या रे,



'सत्य जे असेल, तेच तुला सांगितलं पाहिजे. पंच म्हणजे परमेश्वर. आता या पदावर बसलास की वैर नाही नि दोस्ती नाही.'

पंचापुढे एक्केवाल्याने आणि अलगू चौधरीने आपापली बाजू मांडली. अखेर जुम्मन शेखने पंच म्हणून निवाडा केला, ''बैलाची किंमत अलगू चौधरीला दिली गेली पाहिजे. बैल विकला गेला तेव्हा तो उत्तम होता. निरोगी होता. तेव्हा तो का आणि कसा मेला याच्याशी मूळ मालकाचा संबंध पोहोचत नाही.''

पंच बनलेल्या जुम्मन शेखच्या तोंडचे हे वाक्य ऐकले आणि अलगू चौधरी आनंदाने ओरडला, ''पंच परमेश्वराचा विजय असो!''

पंचायत उठली. लोक आपसांत म्हणत होते, ''याला म्हणतात न्याय. पहा, पंचामध्ये देव असतो म्हणतात ते खोटं नाही!''

जुम्मन शेख उठून अलगू चौधरीजवळ गेला आणि म्हणाला, ''मित्रा, तू माझा निवाडा केलास तेव्हापासून मी तुझा वैरी बनलो होतो; पण आज मला कळलं, पंचाच्या गादीवर जो बसतो त्याला कुणी शत्रू नसतो की मित्र नसतो. न्यायाशिवाय त्याचं नातं दुसऱ्या कुणाशीही नसतं. आज मला कळलं पंच परमेश्वर का असतो ते!''

जुम्मनचे हे बोलणे ऐकले आणि अलगू चौधरीच्या डोळ्यांत पाणी आले. दोघेही मित्र एकमेकांना कडकडून भेटले.



**जायदाद** — मालमत्ता **निवाडा** — निर्णय. **एक्का** — एका बैलाच्या साहाय्याने ओढले जाणारे वाहन. **मोहरा फिरणे** — वागणुकीत फरक पडणे. **अब्रू वेशीवर टांगणे** — बेअब्रू करणे.

## स्वाध्याय

- **प्रश्नांची उत्तरे लिहा.**

  (१) जुम्मन शेखने मावशीची काळजी का घेतली?

(२) 'मी माझी वेगळी राहत जाईन,' असे मावशी कशासाठी म्हणाली?

(३) जुम्मनला पंचायतीची भीती का वाटत नव्हती?

(४) अलगू चौधरीने कोणता निवाडा केला?

(५) अलगू चौधरीचा चेहरा कशामुळे उतरला?

(६) स्वतः पंच झाल्यावर जुम्मन शेखला कोणती गोष्ट कळली?

- **कोण कोणास म्हणाले?**

(१) "अरे वा! रुपये काय झाडाला लागतात होय?"

(२) "बोल जुम्मन, पंच कोण असावा?"

(३) "अर्धमेला बैल गळ्यात बांधला आणि वर पैसे मागतोय?"

(४) "याला म्हणतात न्याय. पहा, पंचामध्ये देव असतो म्हणतात, ते खोटे नाही!"

- **अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.**

(१) तिखट बोलणे. (२) मुठीत असणे.

(३) संधी शोधणे.

- **खालील शब्दसमूहाबद्दल एक शब्द लिहा.**

(१) जिवास जीव देणारा.

(२) गावातील भांडणांचा निर्णय देणारा.

(३) एक बैल जुंपलेली गाडी.

(४) न्यायनिवाडा करण्यासाठी जमलेली गावातील मंडळी.

- **खालील वाक्यांतील नाम, सर्वनाम, विशेषण व क्रियापदे ओळखून वेगळी लिहा.**

(१) बिचारे जनावर महिन्याच्या आतच रस्त्यात मरून पडले.

(२) मी तुझ्या बाजूने बोलून त्याच्याशी वाकडं घेणार नाही.



# २८. गाणी

## १. घनश्याम सुंदरा

घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला
उठिं लौकरि वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥

सायंकाळी एके मेळी द्विजगण अवघे वृक्षी
अरुणोदय होतांच उडाले चरावया पक्षी
करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेऊनी कुक्षीं
यमुनाजळासि जाति मुकुंदा दध्योदन भक्षी ॥ १ ॥

आनंदकंदा प्रभात झाली उठ सरली राती
काढिं धार क्षिरपात्र घेउनी धेनू हंबरती
लक्षिताति वासुरे हरि धेनुस्तनपानाला
उठिं लौकरि वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ २ ॥

विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं
अध्यापन गुरु करिती शिष्यहि अध्ययना उदयी
हे माझे पाडसे सावळे उठ कृष्णाबाई
सिद्धसवें बळिराम घेऊनि गोधने वना जाई ॥ ३ ॥





## २. गे मायभू

गे मायभू तुझे मी फेडीन पांग सारे;
आणीन आरतीला हे सूर्य, चंद्र, तारे.

आई, तुझ्या पुढे मी आहे अजून तान्हा;
शब्दात सोड माझ्या आता हळूच पान्हा.

आई, तुझ्यापुढे ही माझी व्यथा कशाला?
जेव्हा तुझ्यामुळे ह्या जन्मास अर्थ आला.

मी पायधूळ घेतो जेव्हा तुझी जराशी,
माझी ललाट रेषा बनते प्रयागकाशी.

आई, तुझी अशी मी गाईन रोज गाणी;
माझी तुझ्या दुधाने गेली भिजून वाणी !

## ३. पसायदान



आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावे । पसायदान हें ॥ १ ॥

जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
भूतां परस्परे पडो । मैत्र जीवाचे ॥ २ ॥

दुरितांचे तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो जे वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥

वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूमंडळी । भेटतु भूतां ॥ ४ ॥

चला कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ५ ॥

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ६ ॥

किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिही लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥ ७ ॥

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्ट विजयें । होआवें जी ॥८॥

येथ म्हणे विश्वेश्वरावो । हा होईल दानपसाव्रो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ॥९॥

☆ ☆ ☆

